

# प्रस्तावना

वास्तविक पाहिलें असतां देव आणि भक्त यांमध्यें मध्यस्थी करण्याची जशी जरूर नसते त्याप्रमाणें कवि आणि रसिक यांमध्येंहि मध्यस्थी करण्याची जरूर नसावी. तथापि व्यवहार थोडा निराळा पडतो. आणि म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्याचें मीं आनंदानें कबूल केलें. पुण्या-मुंबईकडच्या कवींचा किंवा गद्य लेखकांचा महाराष्ट्राला जसा लवकर परिचय होतो तसा गोमन्तक, दक्षिण हैद्राबाद, इन्दूर-ग्वाल्हेर, किंबहुना वऱ्हाड-नागपूर इकडील कवींचा व लेखकांचा होत नाहीं, याचीं कारणें सरळ व साहजिक आहेत ; त्यांत कोणाचाहि दुष्ट हेतु नसतो. परंतु कारणें सरळ व साहजिक असलीं तरी वस्तुस्थिति कांहीं अभिनन्दनीय नाहीं हें खास. दूरस्थ उदयोन्मुख कवींच्या बाबतींत तर हा अबुद्धिपुरःसर झालेला अन्याय विशेषच अनुभवाला येतो. कारण नियतकालिकांतून मधूनमधून विखुरलेल्या कविता, विशेषेंकरून अपरिचित कवींच्या कविता, मनुष्य क्वचितच वाचतो. अशी परिस्थिति असल्यामुळें अशा कवींचा परिचय करून देणें एक कर्तव्यकर्मच असतें.

मडगांव-गोवा येथील श्रीयुत दामोदर अच्युत कारे यांच्या '**नन्दादीप**' नांवाच्या प्रस्तुत कवितासंग्रहाचा अल्प परिचय करून देण्याचें काम मला विशेष आनन्ददायक वाटतें. कारण या संग्रहांत पुष्कळच परिचययोग्य कविता आहेत. रत्नाकर, मनोरंजन, वागीश्वरी, प्रतिभा, पारिजात वगैरे नियतकालिकांतून त्या प्रसिद्ध झाल्या होत्या व त्या ज्यांनीं प्रसिद्धीच्या वेळीं वाचल्या होत्या त्यांच्या प्रत्ययाला त्यांतील गोडी त्या वेळेसच आली होती. श्रीयुत कारे हे तरुण आहेत, कल्पनाविलास करणारे आहेत,

भावनाशील आहेत, परंतु व्याकरणाच्या नियमांकडे वगैरे दुर्लक्ष करण्याची बंडखोरी त्यांच्यामध्यें अद्यापि दृग्गोचर झालेली नाहीं याबद्दल त्यांचें प्रथम अभिनन्दन केलें पाहिजे. 'पालवी-वैभव' 'बादल-छाया' यांसारखे दोनतीन घेडगुजरी समास दिसतील, 'चिर (=नित्य) हिरवा' अशासारखा संकरात्मक एखादाच शब्दसमूह सांपडेल, दोनतीन ठिकाणीं कर्णकटु यतिभंग झालेला आढळेल, परंतु हे दोष अगदीं अपवादात्मक आहेत. ते येथें दाखविण्याचें कारण एवढेंच कीं, असल्या दोषांकडे दुर्लक्ष करण्याची, किंबहुना त्यांकडे जाणूनउमजून बेफिकिरीच्या दृष्टीनें पाहण्याची प्रवृत्ति अलीकडे बळावत चाललेली दिसते. अशी प्रवृत्ति रा. कारे यांमध्यें दिसून येत नाहीं, ही मुद्दाम नमूद करण्यासारखी गोष्ट आहे. त्यांची भाषा शुद्धच नव्हे, तर सरळ व प्रसादयुक्तहि आहे. अभिप्रेत अर्थ व इष्ट भावना ते लीलेनें व मधुरतेनें व्यक्त करूं शकतात.

> धेनुरवा श्रवुनि वत्स
> पाहि धांव घ्यावयास
> —दावणी परी गळयास !
> तेविं हो मलाही

अशासारखी प्रसादयुक्त व भावनावाहक भाषा बहुतेक सर्वत्र असल्यामुळें स्वच्छ नदीप्रवाहांत लीलेनें पोहत असतांना जसा आनंद होतो तसा हा कवितासंग्रह वाचतांना आनंद होतो. (श्री. कारे हे गोमन्तकीय असल्यामुळें तिकडचे कांहीं शब्द त्यांच्या कवितेंत येतात. यांत कांहीं गैर नाहीं, उलट असे शब्द आल्यानें भाषासमृद्धि होईल. पण जातां जातां अशी एक सूचना करावीशी वाटते कीं, असला अपरिचित प्रान्तिक शब्द एका चरणांत एखादाच आला तर सन्दर्भाच्या अनुरोधानें अर्थ समजतो, पण

अधिक आले तर अर्थप्रतीतीला व्यत्यय येतो हें ध्यानांत ठेवून त्यांचा माफक उपयोग करावा, नाहीं तर कल्पना सुन्दर असून अर्थ न समजल्यामुळें वाचकाचा हिरमोड होईल. उदाहरणार्थ,

कळ लागून मानेला शिर खालीं झुकतसे
देठ बावतां साळीक अधोमुख होई जसें

या ठिकाणीं 'बावतां' ( म्हणजे कोमेजतां ) व 'साळीक' (म्हणजे कमळ) यांपैकीं एखादाच शब्द वापरला गेला असता तर अंदाजानें त्याचा अर्थ थोडाबहुत कळला असता. पण दोन शब्द वापरल्या-मुळें वाचक बुचकळ्यांत पडतो व रसहानि होते.)

श्री. कारे यांचा दुसरा गुण म्हणजे त्यांच्या कल्पनाशक्तीचा सुरम्य विलास. कल्पनाविलासांत बुद्धीचा किंवा भावनेचा अंश नसतो असें नाहीं, तर तो सापेक्षतः कमी असतो इतकेंच. उच्चतम काव्यामध्यें भावनेचें प्राधान्य असतें या दृष्टीनें कल्पनेनें रंगविलेलीं रंगीबेरंगी चित्रें व दाखविलेले बुद्धिचापल्याचे खेळ यांची योग्यता किंचित् कमी दर्जाची असली तरी त्यांतहि रसिकांना आनंददायक असे गुण असतातच, व कविश्रेष्ठांच्याहि काव्यांत कल्पनाविलासांना महत्वाचें स्थान असतेंच. श्रीयुत कारे यांच्या काव्यांत रसिकांना गुदगुल्या करणाऱ्या उपमा व उत्प्रेक्षा हे अलंकार प्राचुर्यानें सांपडतात, तसेंच श्लेषावर आधारलेल्या कांहीं चमत्कृतिजनक कोट्याहि आढळतात. उदाहरणार्थ 'बिजेची कोर' या कवितेंतील पुढील तीन दिंड्या पहा.

नील गगनीं ही कोर तारकांत
जुई-वेलीवर कळी जणु फुलांत !
अजुनि अस्फुट जरि हिचें सर्व कांहीं
दलीं मिटल्या नच गन्ध बद्ध राही.

कृष्णमेघांतुन काढि पथ जपून
ध्येय उज्ज्वल जणु निराशेमधून
दीप्ति लपवाया वाढती पहाती
विमल तेजानें उजळि परि तयां ती !

पारिजाताचा मुग्ध मधुर गन्ध
हिचें तैसें चान्दणें शान्त मन्द
हिला सौदामिनिसम न कळे नाच
कुठुनि लाविल रविपरी जगा काच ?

बौद्धिक कोटीचें उदाहरण पाहावयाचें असल्यास 'आशंका' हा शार्दूलविक्रीडित वृत्तांतला श्लोक देण्यासारखा आहे.

स्पर्शें अल्प पदांगुली प्रभु ! तुझी पाषाणखण्डाप्रती
तों त्यांतून उभी विनम्र पुढती ठाके अहल्या सती !
माझ्या हृत्कमलीं विराजित सदा आहे तुझी मूर्ति ना ?
कैसा दास तुझा तरी पतित हा राहे असा पावना ?

(अहल्येचा येथें उल्लेख आलेला आहे त्यावरून ती शिलारूप कशी झाली याबद्दलची एक सुंदर कोटि 'शापित अहल्या' या कवितेंत आलेली आहे तिची आठवण होते, पण विस्तारभयास्तव ती येथें देत नाहीं. )

रा. कारे यांच्या कवितांत नुसता कल्पनाविलासच असता तर त्यांची 'मौज' या नात्यानेंच मातब्बरी वाटली असती. पण कल्पनाविलासांना सुरम्य व सात्त्विक भावनांची जोड मिळाल्यामुळें त्या रसिकांना विशेष आल्हाददायक झाल्या आहेत. काव्यामध्यें

केवळ अलंकार, भाषानैपुण्य व कल्पनाविलास यांमुळें रसवत्त्व उत्पन्न होणार नाहीं असें नाहीं, पण भावनांचा ओलावा नसल्यास तें काव्य उच्च प्रकारचें गणतां येणार नाहीं. अभिनन्दनीय गोष्ट अशी कीं, रा. कारे यांचें भाषाप्रभुत्व व कल्पनाविलास हीं नेहमीं कोमल व सात्त्विक भावनांशीं निगडित असतात. त्यांच्या भावनांविषयीं बोलतांना एवढा उल्लेख अवश्य केला पाहिजे कीं, त्या सर्व कोमल व सुसंस्कृत आहेत आणि सगळ्यांत अधिक म्हणजे असें कीं, त्या जितक्या नाजूक आहेत तितक्याच सफाईची त्यांची भाषा असून भावनांतील सूक्ष्म छटा यथार्थतेनें, परिणामकारक रीतीनें व अर्थात् मधुरतेनें व्यक्त करण्याचें तिच्यांत बरेंच सामर्थ्य आहे. असंस्कृत स्थितींतल्या सुस्पष्ट व प्रक्षुब्ध भावना भडक रंगांत रंगविणें सोपें आहे, पण सुसंस्कृत लोकांच्या भावनांतील सूक्ष्म छटा नाजूक हातानें चित्रित करणें कठीण असतें, ही गोष्ट ध्यानांत ठेवली म्हणजे रा. कारे यांच्या कवित्वशक्तीचें कौतुक केल्याशिवाय राहवत नाहीं.

रा. कारे यांच्या कवितेचा चवथा गुण म्हणजे त्यांची अकृत्रिम निसर्गभक्ति तींत व्यक्त होते हा होय. निसर्गवर्णनाचा काव्यांत कितपत व कोणत्या हेतूस्तव उपयोग करण्यांत येतो किंवा यावा, हा प्रश्न विस्तारानें विचार करण्यासारखा आहे. येथें एवढेंच सांगणें पुरे कीं, कांहीं कवि निसर्गवर्णनाचे निमित्तानें हरतऱ्हेचा बोध करूं पाहतात, कांहींना निसर्गांत जिकडेतिकडे आनंदीआनंद, मांगल्य, पावित्र्य, सौन्दर्य भरलेलें आहे असें वाटतें व ते त्याची देवासारखी पूजा करूं पाहतात व कांहीं कवि असे असतात कीं त्यांना सृष्टींतील हरतऱ्हेचीं कोमल वा कठोर, सुंदर वा कुरूप दृश्यें बारकाईनें पाहून त्यांचीं यथार्थ वर्णनें करण्यांतच आनंद होतो. मानवी भावनांतील, स्वभावांतील किंवा

प्रसंगांतील विशेष छटा चित्रित करतांना सृष्टींतील देखाव्यांचे दाखले पुष्कळ कवींना उपयोगी पडतात, तर दुसरे कित्येक या देखाव्यांच्या वर्णनाचा मध्यवर्ति प्रसंगांची पार्श्वभूमि रंगविण्याचे कामीं उपयोग करतात. सृष्टींतील विविध दृश्यें पाहून आपणाला काय वाटतें हें कित्येक वेळां कवि वर्णितात, तर मानवी व्यवहारां-तील प्रसंग पाहून सृष्टीला राग येतो, का ती दुःखाश्रु गाळते, का दुसरी एखादी भावना तिच्यांत उत्पन्न होते अशा प्रकारचीं वर्णनें ते कित्येक प्रसंगीं करतात ! रा. कारे यांच्या लहानशा काव्य-संग्रहांत सर्व प्रकारचीं उदाहरणें सांपडतील. तीं येथें देत नाहीं, पण एवढें मात्र आनंदानें नमूद करावेंसें वाटतें कीं, त्यांच्या सृष्टिविषयक उल्लेखांत त्यांची सूक्ष्म निरीक्षणशक्ति दृग्गोचर होते, स्वानुभवाचा सुवास येतो व अकृत्रिम मोकळेपणाचा खुला आवाज ऐकूं येतो. काव्यांत प्रतिबिम्बित झालेल्या भावना बव्हंशीं अकृत्रिम आहेत. त्यांत कवीच्या अलौकिक दिव्य अधिकाराचा दर्प नाहीं, तसेंच सृष्टीशीं गूढ गुंजन आपण करूं शकतों व तिचें रहस्य ओळखून तिच्याशीं समरस होण्याचा अनिर्वचनीय आनंद आपण उपभोगतों अशा प्रकारचा आविर्भावहि नाहीं. पूर्णतेला न पोंचलेल्या अशा विचारशील, भावनाशील व सहृदय मनुष्याला सृष्टीचीं कोमल व गंभीर स्वरूपें पाहून सुचण्यासारखे विचार व जागृत होण्यासारख्या भावना त्यांच्या काव्यांत प्रतिबिंबित झाल्यामुळें ते आपल्यापेक्षां कांहीं बाबतींत अधिक योग्यतेचे व अधिक सामर्थ्यवान् असले तरी त्यांची जात अगदीं निराळी आहे असें वाचकांना वाटत नाहीं. ते गोमन्तकांतले रहिवासी असल्यामुळें अर्थात् तिकडची वनश्री वगैरे त्यांना विशेष परिचित व प्रिय आहे, पण त्यांच्यामध्यें प्रादेशिक दुरभिमानाचा गन्धदेखील नाहीं, ही अभिनन्दनीय गोष्ट आहे.

सृष्टिविषयक कवितांसंबंधानें लिहितांना रा. कारे यांना (व जातां जातां इतर कवींनाहि) असा एक प्रश्न विचारावासा वाटतो कीं, सृष्टि ही सुंदर आहे, पावन आहे, आनंदमय आहे, अशा प्रकारची भावना आपणांमध्यें जी कित्येक वेळां दिसून येते ती खरोखरच साधार आहे कीं काय याविषयीं आपण विचार केला आहे, का तसें आपलें नुसतें वाटतें म्हणून आपण तसें लिहितां ? सृष्टीमध्यें साप, फुरशीं, वाघ, सिंह, कांटे, पातेरा, चिखल, डबकीं वगैरे ज्या गोष्टी आहेत त्यांकडे आपण दुर्लक्ष करतां, का त्यादेखील तुम्हांला एखाद्या 'दिव्य' व 'अनिर्वचनीय' अर्थानें सुंदर, पावन व आनंदमय वाटतात ? आणि एखादे वेळेस तसें वाटत असलें, तर अशा अनाधार भावनेचें मूल्य काय ? तिचें स्तोम माजविणें इष्ट आहे काय ? तत्वज्ञानाच्या दृष्टीनें कवींनीं विचार करावा असें मी म्हणत नाहीं ; मला भावनेचें स्थान व कार्य समजतें. पण महत्वाचीं सत्यें जीं आहेत त्यांजकडे दुर्लक्ष करणारी अविवेकी भावना विशेष इष्ट किंवा सुफलदायी आहे असें मला वाटत नाहीं. सृष्टिपूजक कवींचा आधुनिक कालांतला आदिगुरु जो वर्ड्स्वर्थ त्यालादेखील अखेरीअखेरीला आपल्या सृष्टिविषयक कल्पनांबद्दल व भावनांबद्दल संशय वाटूं लागला होता हें या कवींनीं ध्यानांत धरावें. ही सूचना करीत असतां रा. कारे यांचे व इतर कवींचे सृष्टिविषयक काव्योद्गार वाचून किंवा ऐकून मला आनंद होत नाहीं किंवा त्यांतील सौन्दर्य व रसवत्त्व माझ्या ध्यानांत येत नाहीं असें नाहीं हें, गैरसमज होऊं नये म्हणून, येथें सांगणें आवश्यक आहे.

रा. कारे यांच्या काव्यांतील आणखी एक महत्वाचा गुण सांगावयाचा म्हणजे त्यांतील 'अन्तःकरणपूर्वकता.' जगांतील

अनेक व विविध प्रकारचीं दृश्यें पाहून त्यांचें मन हेलावतें व एका अर्थी त्यांच्याशीं सह-कम्प पावतें, आणि अशा सह-कम्पांतच त्यांच्या कवितांचा उगम झालेला आहे.

घुमे अल्प आघातेंही कांपुनी सतार !
—कसें कम्पनाविण गाणें तरी उपजणार ?—

हें ते जाणून आहेत आणि म्हणूनच कृत्रिमतेचा वास त्यांच्या काव्याला फारसा येत नाहीं. गोमन्तकाभिमान, महात्मा गांधी, अपत्यप्रेम, यौवन-सुलभ प्रेम, सृष्टिप्रेम वगैरे विषयांवरील त्यांच्या काव्यांत शब्दमाधुर्य, गायनानुकूलता वगैरे गुण आहेतच, पण त्यांतल्या त्यांत विशेष म्हणजे हें कीं, मनाला जें खरेंखुरें वाटलें, हृदयांत जें कम्प पावलें, तेंच त्यांच्या काव्यांत प्रतिबिंबित झालें आहे. अर्थात् त्यांत काव्योचित अतिशयोक्ति आहे, पण ती सत्य-गर्भ आहे म्हणून शिष्टसंमत होण्यासारखी व आनंददायी आहे.

रा. कारे यांच्या मनांतील वरचे कप्पे सोडून अगदीं आंतल्या कप्प्यांकडे या काव्यसंग्रहाच्या फटींतून डोकावून पाहण्याचा प्रयत्न केला तर त्यांच्या मनाला एक प्रकारची आध्यात्मिक तळमळ व हुरहूर लागलेली आहे व सृष्टीच्या जीवनाशीं समरस होऊन जावें अशी आकांक्षा त्यांच्या मनाच्या अन्तःकोशांत क्वचित्प्रसंगीं उत्पन्न होत असावी असें दिसून येतें. स्वर्गाची त्यांना फारशी अपेक्षा दिसत नाहीं.

मनीषा स्वर्गसौख्यांची जराही अन्तरीं नाहीं
रुचे माझी सदा मातें धरा वैचित्र्यपूर्णा ही !
फुलें, वेली, नद्या, सिन्धू धरेला चित्रिती रंगीं
इथें वर्णच्छटा नाना !—निळें सारेंच त्या स्वर्गी !

रा. कारे हे कृत्रिम गूढगुंजनाच्या नादीं अद्यापि तरी लागलेले नाहींत ही मला आनंदाची गोष्ट वाटते. अन्तःकरणाच्या प्रकम्पनामुळें उत्पन्न झालेलें स्वानुभवगर्भ गूढगुंजन मला प्रिय आहे, पण असें क्वचितच आढळतें,— बहुधा तें कृत्रिम व अनुकरणात्मक भासतें. ताऱ्यांच्या गर्तींतील किंवा सबंध विश्वांतील गूढ संगीत गूढतर शब्दांच्या द्वारें वर्णन करून आपल्या गूढतम भावना लोकांना कळविण्याच्या ( कांहीं कवींना अभिमानास्पद वाटणाऱ्या ) वेडापासून प्रस्तुत कवि अलिप्त आहेत ही मला तरी अभिनन्दनीय गोष्ट वाटली. कृत्रिमतेनें आत्मवंचनेचें व परवंचनेचें पाप लागतें, व कलादृष्ट्याहि तींत वैगुण्य असतेंच असतें. प्रस्तुत कवीच्या हृदयांत निरनिराळ्या प्रसंगीं ज्या भाव-भावना उत्पन्न झाल्या त्या सरळ व सुन्दर भाषेंत अन्तःकरणपूर्वक प्रथित करण्याचा रा. कारे यांचा स्वतःला व इतरांना आनंद देणारा उद्योग जर असाच चालू राहिला तर 'बिजेची कोर' या कवितेंत इन्दु-कलेसंबंधानें त्यांनीं जें म्हटलेलें आहे तेंच त्यांच्या काव्यकलेसंबंधानें काव्यात्मक भाषेमध्यें म्हणतां येईल असें सांगून व ती कविता उद्धृत करून ही प्रस्तावना आटोपती घेतों.

कला जेव्हां विकसून पूर्णतेनें
वैभवानें विलसेल कोर तेणें,
कान्ति शान्तीसह तिची अवतरून
जगा चुम्बुनि उठवील ग्लानिंतून !

महिला-पाठशाला,
पुणें, २८-७-३४.

वा. म. जोशी.



## ज्योत सारतांना —

आजवर दूर विजनांत राहून महाराष्ट्र-शारदेची मनोभावानें जी एकनिष्ठ सेवा केली तिची साङ्गता म्हणून आज हा नन्दादीप घेऊन तिच्या मन्दिरांत प्रवेश करतांना भावनेच्या आवेगानें माझें पाऊल किंचित् कम्पित होत आहे.

आपल्या वाङ्मयकृतींतील बऱ्यावाईट विशेषांची लेखकाला मनोमय जाणीव असते, पण तरुण माता ज्याप्रमाणें वडिलांपाशीं आपल्या पहिल्याच अपत्याच्या लीला वर्णन करतांना गोंधळून जाते, त्याप्रमाणें ते व्यक्त करण्याचा प्रयत्न त्याला साधत नाहीं. त्याच्या लेखनांतील अनेक मर्मे प्रस्फुटित होण्यासाठीं आतुर होऊन त्याच्या ओठावर गर्दी करीत असतात, पण त्याचें बावरलेलें मन त्याला एकही शब्द उच्चारूं देत नाहीं. तीच स्थिति या प्रसंगीं माझी झाली आहे.

आणि म्हणूनच या नन्दादीपाच्या ज्योतीभोवतालचे किरण उकलून दाखविण्याबद्दल मीं सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ प्रो. वामन मल्हार जोशी, एम्.ए. यांना विनंति केली. स्वतःमागें अनेक दगदगीचीं कामें असतांही तिला मान देऊन त्यांनीं तें काम अत्यंत त्वरित म्हणजे पांचसहा दिवसांत करून दिलें, याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. माझे पूज्य स्नेही व सव्यसाची लेखक श्री. वि. स. खांडेकर यांनीं प्रस्तुत पुस्तकाच्या बाबतींत परोपरीनें मदत पुरवून मला उपकृत करून ठेवलें आहे. ‘गोमन्तक साहित्यसेवक मण्डळा’नें प्रस्तुत पुस्तकाचा पुरस्कार केल्याबद्दल

मी त्याचा ऋणी आहें. याशिवाय ज्या अनेक मित्रांच्या व हितचिंतकांच्या सहाय्याशिवाय हें पुस्तक-प्रकाशन तडीला जाऊं शकलें नसतें, त्यांचीं केवळ नांवें येथें देऊन व ठराविक शब्दांत औपचारिक आभार मानून मोकळें होण्यापेक्षां तीं अन्तःकरणांत कायमचीं बिम्बवून ठेवणें मला अधिक चांगलें वाटतें.

वेष्टनावरील भावमधुर तिरंगी चित्र सुप्रसिद्ध गोमन्तकीय चित्रकार श्री. र. गो. चिमुलकर यांच्या कौशल्यपूर्ण कुंचलींतून उतरलें आहे.

कवितांवर दिलेलीं वृत्तांचीं नांवें श्री. मा. त्रिं. पटवर्धन यांच्या 'छन्दोरचने'वरून घेतलीं आहेत. मात्र 'सुरेख संगम किती' या चालीवरील जातीला त्यांनीं दिलेलें 'शूर्पणखा' हें नांव माझ्या सौन्दर्यदृष्टीला न पटल्यामुळें त्याऐवजीं मी 'संगम' हें नांव वापरलें आहे. 'नन्दादीप' व 'तळमळ' या कविता अभंगा-प्रमाणें छन्दांत म्हणजे अक्षरसंख्याक वृत्तांत रचल्या आहेत हें, वाचक बुचकळ्यांत पडूं नयेत म्हणून, सांगणें अवश्य आहे.

या नन्दादीपाच्या ज्योतीचें मन्द तेज कितपत स्निग्ध व धुन्द आहे, तें ठरविण्याचें काम रसिकांचें आहे. तथापि अन्तःकरणांत इच्छा एवढीच कीं, त्याच्या —

सन्थ ज्योतीमाजी जागो । प्रीति अथांग आन्तर.

मडगांव,<br>
ता. २०-८-३४.

दामोदर अच्युत कारे.

# अनुक्रमणिका



# नन्दादीप

## हृदयमन्दिर.

[जाति—भूपति.]

हें पहा उघडिलें हृदयमन्दिर-द्वार
चल, आंत शिरोनी गाजव तव अधिकार !

हे प्रेमभक्तिचे स्निग्ध दीप उजळीले
दिव्यता-प्रभेनें मन्दिर कोन्दुनि गेलें !

गुम्फिली सुनिर्मल भावसुमांची माला
अणुअणूंत आदर-सौरभ हा दरवळला !

बघ उत्सुक दारीं उभें ठाकलें चित्त
तव आगमनाची असे प्रतीक्षा करित

ये ! होइं अधिष्ठित हृदयमन्दिरीं मम या
करिं पावन त्याला पादस्पर्शें तुझिया !

मडगांव, ता. २०-९-२५.

# नन्दादीप.

[राग–कानडा.]

मृदु करें उजळिला त्वन्मन्दिरीं नन्दादीप
राहो तेवत सन्तत तव चरणांसमीप.
नको तेजाची झळाळी जननेत्र दिपवाया
ठेवीं हृदयीं ओलावा ज्योत पायीं जागवाया
नानारंगी तुज माला अर्पायाला जन किती
दिनभरी कोलाहल दारीं तुझिया करिती
शिरावया तयांमाजी अधीर न हा होईल
परी प्रतीक्षा करीत शान्त अन्तरें राहील !
येतां निःस्पन्द नीरव मध्यरात्रीचा समय
तव पायीं हा ओपील उचम्बळलें हृदय !
तव मुखाभोंवतालीं तेजोवलय विणील
कलेसवें अन्तरींचे त्यांत भावही गुम्फील
अपार्थिव किरणांनीं तुझे चरण चुम्बील
तेजोलहरी अन्तर लोपवितील मधील
तुज पाहील स्तिमित अर्धोन्मीलित नयनीं
मूक हृद्गत पाझरो मग सहस्र किरणीं !
सन्थ ज्योतीमाजी जागो प्रीति अथांग आन्तर
मधुरिमा चान्दण्याची येवो स्वर्णतेजावर
लय लागो तैं एकान्तीं विरो दृश्याचा पसारा
गूढ मन्द भाव-दीप्ति भरो मन्दिर-गाभारा !

ता. १४-९-३३.

# उषःकाल.

[वृत्त–शार्दूलविक्रीडित.]

जें जें मंगल वा पवित्र भरलें सम्पूर्ण विश्वांत या
प्रातःकालिंच सृष्टि व्यक्त करिते सौन्दर्ययोगें तया !
भासे या समयीं कुणी द्युतिमती ओजस्विनी देवता,
अंगांगांत समावुनी न निथळे पावित्र्य निर्व्याजता !

वारा ये झुळझूळ मन्द, निमिषीं काया गमे भारली
लीलेनें पवनीं तरंगत मुदें गाई विहंगावली
येई जाग हळू प्रसन्न मधुरा विश्वाचिया जीवना,
सारें हें हृदयीं उदात्ततमशा उद्दीपवी भावना !

संसारातप सोसुनी निशिदिनीं ये ग्लानि देहीं मनीं
प्रत्यूषीं परि कर्णिं कूजन शिरे आशा सवें घेउनी
जातां संपुनियां जसा प्रलय, ये शान्ती तयामागुन
रात्रीमागुन ही प्रभात जगता देई पुनर्जीवन !

विश्वाचें जणु रम्य शैशव गमे आहे उषःकाल हा
खेळे हास्य मुखीं निरागस खुलें तेणेंच ऐसें अहा !

ता. २१-१२-२५.

# गोमन्त-देवी.

[चाल-महाराष्ट्रगीताची.]

स्मरुनी गोमन्त-देवि! मूर्ति सौख्यदा
प्रेमभरें हृदय भरे, नमन तव पदां!

सम्राज्ञीपद तुझेंच गमत सृष्टिचें
सिंहासन सह्याद्री, खालिं गालिचे—
अंथरिले हरित-धवल गवत-वाळुचे!
या प्रभावळींत भव्य पहुडशी सदा १

नारळितरु छत्र करी देवि! तुजवरी
दुग्धधार धरित दूधसागरहि शिरीं!
सिन्धुलहारि चुम्बिति तव चरण वरिवरी
वैभव तव अनुपमेय, अतुल सम्पदा २

कुन्तालिं तव केतकि, वरि आम्रमंजरी,
रजतधवल निर्झर पदिं पैंजणांपरी,
सरोमुकुरिं निरखिसि निज रूपमाधुरी
उचित प्रसाधन-साधन राज्ञिच्या पदा! ३

विमल उजळ चिर हिरवा शालु तव किती!
बहुरंगी रम्य फुलें त्यास खुलविती
देवालय-कळस तुझे मुकुट भासती
शोभति किति रवि-शशि-करिं तळपती यदा! ४

तव महिमा गाति नद्या सतत वाहुनी
यशपरिमल वायु नेइ दशदिशांतुनी
विंझणवारा करिती तरुहि डोलुनी
सकल करिति तव सेवा गौरवास्पदा. ५

तव सेवा-कार्य घडो मजहि अल्पसें
अंकित तव रूप असो हृदय-पटिं असें.
जीव-सुमन पूजेस्तव तवचि हें असे,
जाणिव ही देवि ! वसो हृदयिं सर्वदा ! ६

मडगांव, ता. २४-२-२९.

---

## सागरास —

[जाति-चंद्रकांत.]

तृप्ति न होई निशिदिन तुजला जरि निरखित राहीं
भरे अन्तरीं अनिवार तरी किति आकुलता ही !

तन्मय होणें वैचित्र्यमयी तव लीलांमाजी,
त्यजुनी सगळें मन गुंतविलें या एका काजीं.

अगाध तव विस्तार पाहुनी गम्भीर अपार
प्रथम मानवी क्षुद्र हृदय मम पावे भय फार !

परी चिरन्तन तुझी दिव्यता नकळत हृदिं ठसुनी
तुजविण जगतीं कुणीहि मजला आज न ये दिसुनी
विचारलहरी समगति वरिती तुझिया लहरींशीं
हृदयावरल्या धुउनी नेती संचित मलराशी !

*
* *

अनन्त रूपें तुझीं तरळती मम नयनांपुढती
सत्य रूप परि कळूं न देई तव चंचल रीती !
महामुनीपरि दिससी केव्हां प्रशान्त गम्भीर
क्रोधावेशीं परी भासशी उच्छृंखल वीर !
प्रभातसमयीं बालसूर्य तुज पाहतसे हसुनी
मन्दस्मित त्या वेळीं खेळे प्रेमळ तव वदनीं
मध्यान्ह-रवी वितरी जेव्हां किरण तुझ्यावरती
किति तेजस्वी छटा तळपुनी शान्त मुखीं खुलती !
धुन्द रुपेरी नयनकिरण निज फेकि यदा इन्दु
गाढ काव्यमयताच विलसते नयनिं तुझ्या सिन्धु !

*
* *

नभा व्यापिती जेव्हां काळेकभिन्न ते मेघ
हळुहळु तेव्हां तव लहरींचा वाढतसे वेग.

नभोमण्डळीं घन वाजविती गभीर रणभेरी
तालावर त्या स्वैर मांडिती नृत्य तुझ्या लहरी

सृष्टि कांपते ! वृष्टि अखण्डित पडे मुसळधार
रुद्ररूप तूं घेसि प्रलयिंचें भयदायक फार !

गर्जत गगना भेदायाला झटसी अविराम
उन्मादें तव हृदय उसळतें होउनि बेफाम

काळजिभा पसरुनी जगाला ग्रासाया बघसी
आणि धुन्दिनें संहाराच्या अवकाशा भरिसी !

* * *

थाम्बवुनी परि ताण्डव अपुलें होसि यदा शान्त
शान्तिदेवता त्या समयीं तूं दिससि मूर्तिमन्त !

वक्षस्थल तव विशाल दावी औदार्या तुझिया
केविं खवळसी तरी वादळीं, शंका ये हृदया !

मृदु मृदु कोमल लहरि नाचती तव अंकावरती
स्वैरविहारी समीरणाशीं गुजगोष्टी करिती

कुरवाळुनि त्यां वात्सल्यानें देसि बागडाया
अथांग दिसते हृदयीं भरली मातेची माया.

नवचैतन्या तुझ्या आणुनी वायु हृर्दी वर्षी
शान्तिमय तुझी वत्सल मूर्ती चित्ता आकर्षी !

*
* *

सकलहि रूपें तुझीं आज परि मजपुढुनी विरती
स्वरलयिची तव एकच उरली हृदयीं अनुभूति.

दृष्टि निमाली, कान जहाले माझ्या नयनांचे
कणकण तनुचे हृदिं सांठविती सूरच गानाचे !

महाकवीची वज्रगभीरा घुमे जशी वाणी
तशीं सागरा ! तुझींहि गमती अखण्ड हीं गाणीं !

सृष्टि मोहुनी त्या गानाचा करिते अनुकार
प्रतिध्वनी हें नांव जयाला देई व्यवहार !

अनन्तकालापासुनि चाले तव अनन्त-गीत
अनन्तकालहि विश्व रहाशिल त्यानें घुमवीत.

तव ‘धोधो’ रव होइ निनादित शून्य अन्तरांत
अर्थ न समजे, परी नादमय होउनि तें जात.

अगम्य कांहीं गभीरता जी त्यांतील उदास
न कळे कुठला वेध विलक्षण लावी हृदयास !

करुण सूर ते हृदयावर घन छाया पसरीती
बादलछाया मृगारम्भि तव जेविं जलावरती !
जलधारेनें शिला दरींतिल झिजुन जशी जाते
मम संवेदनशक्ति बधिरली या नादाघातें.
निगूढ गीतें झरती कसलीं तुझ्या रवांतून ?
व्याकुळ हृदया शान्त करीं तें रहस्य उकलून.

*
* *

तव गानाच्या सांपडूनियां तीव्र प्रवाहांत
फुलापरी हा जीव सारखा जाई वाहात !
हेलकावते नाव कवळि तव तुफान-लाटांचे
ताबा सुटुनी स्वरलहरींवर तेविं तुझ्या नाचे
प्रतिकाराची शक्ति बुद्धिही लुली असे झाली
सत्ता माझी मलाच नकळत मजवरती नुरली
मीच वाहतां बघणें आलें मज उघड्या डोळीं
स्वप्नमूढता जिवा अनावर अवचित ही आली !
अणुअणु आन्दोलून जाहला जीव मृदुल फार
तूंच तया दे रुचेल तुज तो आतां आकार !

*
* *

गूढ माधुरी जी तव अविरत वसे गर्जितांत
उचम्बळवि वर हृदयतळींचें कांहीं अज्ञात !

हुरहुर वाढे अन्तरिं कां ही, न कळे मज कांहीं
विश्वामाजी विलीन व्हाया आत्मा कां पाही ?

ऐहिकतेचें हृदयावरती दाटे जें पटल
दिव्य गायनें काय तुझ्या तें होत असे विरल ?

चिरपरिचितसे ऐकूं येती सूर तुझ्या गानीं
स्तब्ध जाहलें प्राण-वासरूं कान उभारोनी !

अनन्तांतली हाक लपुनि ये तव गानांतून
हृद्वीणेवर तरलपणानें जाय निनादून.

जन्मोजन्मीं ध्यास जिवाला एकचि जो लागे
आज अन्तरीं उत्कटतेनें तोच पुन्हा जागे !

*
* *

जड जगताच्या, पार्थिवतेच्या बन्धनांमधून—
मुक्त करुनि मज अनन्त-हृदयीं नेईं वाहून !

दिनकर जेथें तुझ्या अन्तरीं प्रवेश करुनीयां
नव तेजानें पूरित होउन प्रतिदिन ये उदया

नील नभश्री जिथें चुम्बिते भाल तव विशाल
चुम्बन-मीलन अभंग असलें नटलें चिरकाल !

दिव्यत्वाचा खेळे जेथें नित्य मुक्त वारा,
स्वार्थ-द्वेषां, क्षुद्र बन्धनां लव न जिथें थारा

भव्य गगन हें आशिर्वादा कर जेथें पसरी
अंक सुविस्तृत तुझा खालुनी तेविं अभय वितरी

अखिल जगांतिल कोलाहल ये माघारा जिथुनी
गभीर शून्यामधें पदार्पण कराया न धजुनी !
अनन्ततेचें चिन्तन करिते ध्यानमग्न शान्ति
ओवाळाया तिजला उजळी तारांच्या ज्योती !

त्या तेजाची धुन्द मन्दता झळकवि मौनास
मूक गूढ रव अखण्ड घुमुनी व्यापी अवकाश !

धुन्द शान्तिनें कोन्दुनि गेल्या भव्य शून्यतेंत
अनन्ततेच्या पदीं जळूं दे आत्म्याची ज्योत !

१९२७.

# पावसाळ्यांतील दृश्य

[वृत्त–शार्दूलविक्रीडित.]

काळेकुट्ट भयाण मेघ जमती साऱ्या नभोमण्डलीं
सूर्याची किरणावली न शकली याया धरित्री-तलीं
विश्वीं अन्धुकता दिसे पसरली—सर्वत्र हो स्तब्धता
सृष्टीच्या हसऱ्या प्रफुल्ल वदनीं येई उदासीनता !

ये अन्धारुन व्योम....होइ भुरकें....सम्पूर्ण तें काजळे
एकाएकिंच तों सरींवर सरी पाऊसही कोसळे !
दुःखावेग अदम्य दाटुनि जणू येती नभाच्या मनीं
नेत्रीं धावति अश्रु बांध सहसा चित्तांतला फोडुनी !

होतां भार गळून उर हलकें जाई मनींची दुखी
शोभे निर्मल सुप्रसन्न फिरुनी ती नील कान्ती मुखीं
तों अस्ताचलिं सूर्यबिम्ब विलसे आरक्त चेतोहर
सोनेरी किरणें क्षणीं उतरती उत्तुंग वृक्षांवर !

कीं कापूसच पिंजला, घनिं अशा फांकूनियां ती प्रभा
त्यांना वर्ण अवर्णनीय वरिती, येई झळाळी नभा !
व्योमींचे जलबिन्दु घेइ तृण जे झेलून पात्यांवरी
सूर्याच्या किरणीं अतां चमकती शिंपांत मोत्यांपरी !

मडगांव, ता. २८-६-२६.

# शिखरावरून—*

[वृत्त–शार्दूलविक्रीडित.]

शैलीं ठाकुनि उंच या वळवितां दृष्टी जरा खालती
आत्मा मुक्त विशाल होइ निमिषीं, व्यापीत विश्वाप्रती !
जें सृष्टींत चहूंकडे रसरसे चैतन्य सौन्दर्यही
स्पर्शे तें हृदयांत खोल ! दिसते आतां नवी ही मही.

होई रम्य जिवंत रंग हिरवा सर्वत्र दृग्गोचर
पोटीं मानवसृष्टि घेउनि वरी येई हरित्सागर !
पानें पल्लव हिर्वळी — नच दुजें यावीण कांहीं कुठें
या सौन्दर्यफुलांवरून पळही दृष्टी न माझी उठे !

रेषा रेखिव दृश्य दूर क्षितिजीं जी वर्तुलाकार ही
हें विस्तीर्ण अनन्त डोइवरती विस्तारलें व्योमही
वाटोळें रविबिम्ब शान्त जलधीपृष्ठावरी टेकलें
सन्ध्यातेजहि धुन्द्कारुनि दऱ्या आरक्त हें फांकलें !

भव्यत्वें अपुल्या विमूढ करुनी चित्ताप्रती टाकिती
सौन्दर्यें अपुल्या विमुग्ध करुनी पाशीं तया गोविती !

मडगांव, ता. २६-३-२६.

* मडगांव येथील टेकडीवरून दिसणारा भव्यगम्भीर देखावा.

## दर्शन

[वृत्त-शार्दूलविक्रीडित.]

शुक्राची उगवे प्रभातसमयीं जैशी नभीं चान्दणी
पूर्वेला मधु मंजु तेज पसरी, घे चित्त आकर्षुनी
दिक्प्रान्ताप्रति आसमन्ति अपुल्या स्वर्गीयतेनें भरी !
होतां गे ! तव मूर्ति-दर्शन मला भासे तसें अन्तरीं

पावित्र्या उधळीत जासि निघुनी देवी ! प्रदेशांत या
या वातावरणीं सुगन्ध भरिसी निःश्वास सोडूनियां
वाटे भूमिहि होतसे पुलकिता तूझ्या पदस्पर्शनें !
हा आश्चर्यविमूढ भक्त तव गे ! निःस्तब्ध येथें बने

देवी ! पाहिं मुखा तुझ्या टक जरी लावून वेड्यापरी
शंका, भीति मनामधें लवभरी आणूं नको गे परी !
पावित्र्यद्युति जी मुखावरि तुझ्या देवी ! दिसे फांकली
त्या तेजोवलयींच दृष्टि खिळुनी माझी असे राहिली

आहे सुन्दरता मुखीं तव, परी ती स्वर्गदेवीपरी !
लोभाची मग केविं मानव-मनीं येईल स्पर्धा तरी ?
जाती अस्थिर सर्वही विरुनियां हीं भावनान्दोलनें
चित्तीं आदरभावनेविण नुरे कांहीं तुझ्या दर्शनें !

मडगांव, ता. २८-८-२७.

## चांदणें

[जाति–फुलवेल.]

इन्दु उदयाला । चारुता घेउनी आला

गहन गगन वर निर्मल विलसे
स्वमन उमलतें बघुनि चकितसें !
मूक शान्त विश्रान्तिरिं बरसे—
हृदय-दिव्यांला । भरि कांठोकांठ तयाला

झरुनि कौमुदी क्लान्त सरोवर
सुप्तींतच करि चुळबुळ पळभर
विरे थरारुनि रोमांच-लहर
गुंग जिव झाला । कवळून इन्दुबिम्बाला !

सगुण रूप सौन्दर्य घेउनी
चन्द्रिकामिषें का ये भुवनीं
मानवहृदयांना शान्तवुनी—
उमलवायाला । दावाया दिव्य पथाला ?

स्वप्नीं स्पर्शति जे हृदयास
स्वर्गीयत्वाचे आभास
मूर्तचि दिसतां ते नयनांस
हा उचम्बळला । भावजलनिधी खळबळला !

स्वप्नसृष्टि ही विलोल हसते—
जागृत नयनांपुढें नाचते ?
विहार मन वा स्वप्नीं करितें ?
बल न हृदयाला । हें गूढ सोडवायाला !

अष्टदिशांना धुन्दी आली
सृष्टि अखिल ही अन्धुक झाली
गुन्तुनि गेली तन्द्रा-जालीं
भावही विरला । नच शुद्धबुद्धही तिजला

मन्द वाहती शीतल वारे
दिव्यत्वाचा झरा पाझरे !
धूसरता ही सर्वत्र भरे
धुन्द नयनांला । बेभान करी हृदयाला !

मडगांव, ता. ९-८-२६.

# गृहलक्ष्मीची लक्ष्मी*

[ वृत्त–शार्दूलविक्रीडित ]

आकाशीं निमिषार्धमात्र उतरे विद्युल्लता ती जरी
काळ्याशार ढगांवरी विखरुनी दे दिव्य दीप्ती परी !
सान्निध्यें अपुल्या, उदास पडक्या या चन्द्रमौळी गृहा
शोभा देसि तशी ! खरीच दिसशी लक्ष्मी गृहीं या, अहा !

संसारास सिध्या, गरीबच कुणा सद्भाग्यवन्ताचिया
सौख्यानें भरिसी, प्रसन्न करिसी माधुर्य देवोनियां !
कान्ती ही वदनीं कुलीन, विनयें कैशी दिसे शोभुनी
गे ! जातील दुरी अभाव पळुनी सारे तुला पाहुनी !

घाली घट्ट मिठी करीं चिमुकल्या तान्हा तुझा हा तुला
प्रेमें तूं कुरवाळिसी कवळुनी वक्षावरी त्याजला
जैसें रत्न सुवर्णकोन्दणिं खुले देदीप्यमान् मोहक
बाहूंच्या वलयीं तुझ्या दिसतसे तैसाच हा बालक !

लक्ष्मी तूं गृहिं या, परन्तु तुजला हा बाळ लक्ष्मी असे
सारें विश्वहि हें तुला गमतसे ज्याच्यापुढें तुच्छसें !

मडगांव, ता. १-१२-२७.

* मुलाला कडेवर घेतलेल्या एका गृहलक्ष्मीच्या दर्शनानें मनांत उठलेले तरंग.

# मायलेकरें *

[ जाति-दिंडी ]

भूमिमातेला बिलगुनी बसून
तिच्या पदरीं लपवीत मुख मधून
विरल छायामय अशीं मेघबाळें
करित होतीं स्वच्छन्द बाळचाळे !

सहज कुठुनी पातला वायु तेथें
भुले बघुनी त्या चपल बालकांतें
वदे "बाळांनो ! आवडे तुम्हांस
काय इवली ही धरा खेळण्यास ?

चला, येतां ? नेईन तुम्हांला मी
निळ्या मैदानीं अति विशाल नामी.
धवल कुसुमें चिमुकलीं उमलतात
आणि खुलवीती निशीं तें नितान्त !"

कसा भोळ्या त्या बालकां कळावा
समीराचा हा कपटपूर्ण कावा ?
हृदयिं कौतूहल बालसुलभ जागे
जाय निघुनी संमती वदनमार्गें !

* पावसाळ्यानंतर भूमींतून उन्हानें निघणारे पाण्याच्या वाफेचे लोट म्हणजे तिचीं मेघबाळेंच नव्हत का ?

घाइघाईनें उचलुनी तयांना
कटीखांदीं बसवीत वायुराणा
क्षणीं घेई उड्डाण अन्तरालीं
बालकेंही क्षण मुदित मुग्ध झालीं !

वेग वायूचा अतुल सदा; तोही —
हर्षयोगें द्विगुणितचि आज होई.
व्योमरूपी विस्तीर्ण बन्दिशाळा
तींत कोंडूनी ठेवि मेघबाळां.

देह पसरोनी अडवि पूर्ण दार
आणि राही रक्षणीं दक्ष फार.
आंत तळमळती दुःखमग्न बाळें
येति शोकाचे वरिवरी उमाळे

सकल-हृदयीं विकलता भरुनि राहे
करुण नयनीं अनुताप-नीर वाहे :—
'काय दुर्बुद्धी सुचे मनाला ही !
अतां जन्मीं दिसणार नाहिं आई.'

परी कालक्रम शमवि शोक सारा
हृदीं आनन्दा करुनि देइ थारा

दुःखरूपी भडकली जिथें आग
तिथें मोदाची तरारली बाग !

नवें जीवन मोहवी मनालागीं
कुठुनि आईची स्मृति उरेल जागी ?
उणें गगनांगण करिति खेळुनीयां
स्वैरतेनें कधिं लागती फिराया

रंगिबेरंगी करुनि वेष नामी
जाति सन्ध्या-समयास इन्द्रधामीं
आणि नृत्याची करिति तिथें शर्थ
इन्द्ररायाच्या मनोविनोदार्थ !

सडा सुमनांचा निशीथीं टिपोनी
भूषवीती कधिं गौर तनु फुलांनीं !
दिवस जातां यापरी, अल्प काळें—
नव्या रंगीं रंगती पूर्ण बाळें !

हर्ष-कोलाहल बघुनि असा सारा
एक बालक परि खिन्न मनिं बिचारा
त्यांत मिसळाया कधिं न लवहि वांछी
रीत अन्यांहुनि आगळी तयाची !

दूर विजनीं निज जीवनास कण्ठी
स्थिती अपुली निःस्तब्ध चित्तिं चिन्ती
सांवळाच दिसे, नसे गौरकाय
मायविरहें परि हृदय घेइ हाय !

प्रखर दुःखांची सभोवतीं खाई
कळी कोमल करपुनी हाय ! जाई
टिपें डोळ्यांतुनि अकारणहि गाळी
दिव्य माला ओघळे भूमि-भाळीं !

विषय मातेविण दुजा मनिं न आणी
होइ त्याची मग दशा खुळ्यावाणी

हृदयिं उत्कण्ठा बळावली फार
प्रयासांनीं मग चढुनि एकवार
बन्दिशालेच्या तटावरुनि पाही
दिसे त्याला तों दृश्य दुःखदायी :—

'ग्रीष्मतापें तापली भूमिमाता
दीन अबलेला नसे कुणी त्राता
पुत्रविरहाचें दुःख मना जाची
त्यांत ग्रीष्माच्या पडे भर छळाची !'

नयन झांकी !— तें दृश्य पाहवेना
पळहि परि आतां स्वस्थ राहवेना
माउलीची चालली गांजणूक
कळुनि बाळाचें दुणावलें दुःख !

हाय ! कैशी विपरीत दैवलीला
बघे नयनीं जरि त्रस्त माउलीला
मार्ग नाहीं परि तिच्या मुक्ततेला
— देह त्याचा कैदेंत गुन्तलेला !

विचारांनीं क्षोभुनी चित्त जाई
परी गवसे नच मार्ग यशोदायी ;
वीज सहसा चमकली मनामाजी —
'प्राणमोलें रक्षीन माय माझी !'

तेज वदनीं झळकलें निश्चयाचें
कळीकाळासहि जें न गणायाचें
आणि हंबरडा फोडुनियां 'आई !'
उडी आवेगें नभांतून घेई !

❀

तीव्र तापांतुनि जरी मुक्त झाली
प्रीति पुत्राची दिसुनि मनीं धाली,

पुत्रतनुच्या परि चिंधळ्या बघून
भूमिमातेला येइ गहिंवरून.

क्षणचि दिसुनी रवि मेघ नभिं भरावे
तसें येई सुख तोंच दुःख धांवे !
दिव्य सद्गुण निज सुताचे स्मरून
तिचें हळवें मन जाइ व्याकळून !

महानिद्रेंतुनि तया जागवाया
करुण दृष्टीनें विनवि भानुराया
तदा कळवळुनी भानु दीन-वाली
कर-स्पर्शें चैतन्य झणीं घाली !

अंकिं जागृत सुत पुनरपी सहास
हसुनि भूमीनें निरखिलें तयास
आणि प्रेमें कवळुनी तया पोटीं
चुम्बनाला मिळविले ओठ ओठीं !

मडगांव, ता. १९-५-२९.

# आत्मयज्ञ

[ वृत्त-मदालसा ]

नेत्रांत पाणी एकदां या खेळलें बिजलीपरी
पाणी क्षणामाजी पुरें जें शत्रुचित्ताचें करी
आतां तिथें पाणी उरे गालांवरी जें पाझरे
कैशी अकस्मात् अक्षिणीची आज ही कांडी फिरे !

जाज्वल्य शौर्यज्योति पूर्वीं तेवली या अन्तरीं
झेपावुनी जीच्यावरी जळले अरी मशकांपरी
दुःखाग्निची ज्वाला दिसे तेथेंच आतां पेटती
रिपु कोठले ? उलटी सुटे जाळीत चित्तालाच ती !

कां जाळुनी घेणें परी दुःखांचिया खाईंत या ?
आत्मीय त्यागबलें तिला यज्ञस्वरूपा देउंया.
होमून मोहा अर्पुंया भोगाहुती यज्ञानलीं
या आत्मयज्ञस्थण्डिलीं स्वार्थाप्रती देऊं बली !

नेत्रांतुनी सांडूं न पाणी ; धार चित्तीं सोडुन—
स्वातन्त्र्यदेवीला करूं तनुचित्तवित्त समर्पण.
जावो जळोनी हीण सारें, हेम होवो उज्ज्वल
ज्वाला-दलें फुलुनी डुलो यज्ञानलाचें उत्पल !

स्वातन्त्र्य-लक्ष्मी दिव्य यज्ञें सुप्रसन्ना होउनी
प्रकटेल तत्क्षणिं द्यावया वरदान त्या यज्ञांतुनी !

मडगांव, ता. २०-८-२९.

## तुझा मुरली-रव

[ जाति-अवनी ]

अस्फुट तव मुरली-रव श्रवणिं निमिष येई
परि जिवास चिर चटका लावुनियां जाई !

परिसतांच सूर मधुर
स्तिमित चकित हो अन्तर
थबकुनि मम राहति कर
ठायिंच्याच ठायीं !

दिव्य भावनानुभूति
घेति सकल चित्तवृत्ति
चिन्मयता ती स्वरतति
तनुसहि जणु देई !

घुमविसि ते जिथुनि सूर
स्थान कुठें तें सुदूर ?
जीव लागुनी हुरहुर
ओढ तेथ घेई

धेनुरवा श्रवुनि वत्स
पाहि धांव घ्यावयास,
—दावणी परी गळ्यास !
तेविं हो मलाही

बन्धमुक्त व्हावयास
विफल करीं मी प्रयास,
अधिक जखडिती जिवास
मात्र बन्धनें हीं !

तों प्रचण्ड या अविरत
संसृति-कोलाहलांत
क्षणिं रव तव लुप्त होत
श्रवणसुख न तेंही !

जीव तदुपरी अजून
वेड वेणुचें जडून
तळमळे कढे झुरून
उन्मनस्क राही

चालला निघून काल
प्रतीक्षेंत जीव विकल
आजीवन काय विफल
आस व्हायची ही ?

मडगांव, ता. २७-७-२९.

## प्रतिभेस —

[ वृत्त–शार्दूलविक्रीडित ]

घाली हा व्यवहार पाश अपुले माझ्या जिवाभोवतीं
होई यास्तव प्रेमले ! तुजकडे दुर्लक्ष माझें अती,
ठावें हें ; हृदयास या कितितरी होती तयें यातना !
कैसें हाय ! करूं परी ? अडकला हा जीव फासांत ना ?

दिव्योदात्त-पुरें सदा वसविणें शून्यामधें जाउनी
ध्येयाची परिपूर्णता मिळविणें या मानवी जीवनीं
सृष्टीच्या हृदयान्तरीं शिरुनियां गूढें तिचीं सोडणें
स्वर्गाची रमणीयता अनुपमा पृथ्वीप्रती आणणें !

ही कार्यावलि विश्वपूजित अशी आहे तुझी देवते !
राबावें व्यवहारिं हाय ! तुजला माझ्यामुळें लागतें
संगें घेउनियां तुला गगनिं मीं घ्यावी भरारी वरी,
नाहीं आजवरी तुझी पुरविली ही हौसही मीं परी !

त्याची तूं करिशील ना प्रियतमे ! दीनाप्रती या क्षमा ?
कैसें प्रेम तुला मदीय पटवूं ? वाणी असे अक्षमा !
चित्तीं घे :– 'जरि बुद्धि गुन्तुनि उरे संसारपाशान्तरीं
सत्ता चालतसे तुझीच हृदयीं माझ्या सदाची परी !'

मडगांव, ता. १३-१०-२८.

# हिमालयास —

[ वृत्त–शार्दूलविक्रीडित ]

भूमाताहृदयामधून निघतां बाहेर विश्रांत या
जासी कापुनि मेघजालहि वरी आकाश भेदावया !
आश्चर्यप्रद पाहुनी गिरिवरा ! ऐशी कृती निस्तुला
प्रेमें अर्पिति गौरवार्थ सुरही माला हिमाची तुला !

आहे हें हिम ? वा किरीट झळके हा शुभ्र तुझ्या शिरीं ?
—शैलांचा अधिराज तूंच असती कीं सर्व पृथ्वीवरी !
ठेवोनी स्वपदें कलंकित नरें केला न माथा तव
राहे काय पवित्रता हिममिषें तेथें सदा यास्तव ?

कीं व्योमांत विहार स्वैर करिती जीं देवदूतांपरी
शोभे निर्मलता मनीं, धवलता तैशीच देहावरी
वाहे प्रेमझरा उरांतुनि जणू तृष्णार्त-संजीवनी
येती तीं घन-बालकें तव शिरीं स्वस्थान का सोडुनी ?

कीं या भारतभूमिची उभविसी शुभ्र ध्वजा अम्बरीं
होई मानवदृष्टिही जिथवरी जायाप्रती घाबरी !
‘विश्वीं श्रेष्ठच भूमिका अजुनिही या भारताची असे’
व्योमीं तो ध्वज निष्कलंक धरुनी तूं दाविसी का असें ?

## हिमालयास

गंगा सिन्धु असे तुझ्या हृदयिंचे प्रेमौघ जे वाहती
आर्यावर्त असे तुला प्रिय किती तें स्पष्ट ते दाविती.
त्यांनीं वैभव अर्पिलें नवनवें उन्मेषशाली तया
तूं दिक्पालच उत्तरेस जणु तें ऐश्वर्य रक्षावया !

माथां निर्मल नील वर्ण, हिरवी सृष्टी फुले खालती
पाया लुप्त धुक्यांत, शुभ्र शिखरें तेजामधें नाहती !
ऐशी धीरगभीर मूर्ति तव ही वृत्ती करी उन्मन
अज्ञातांत कुठें किती गत युगें लंघून नेई मन !

झालासी प्रिय पुण्यभूमि मुनिंची शैलेश्वरा ! एकदां
त्यांची मस्तकिं पादधूलि धरुनी तूं धन्य होसी तदा !
झाले घोषित वेदमन्त्र मुनिंच्या गम्भीर कण्ठांतुनी
त्यांच्या झंकृत दिव्य नादलहरी तेव्हां जहाल्या वनीं

'लेवोनी हिमवस्त्र सृष्टि खुलते देवीपरी सन्तत
वर्फाच्छादित शुभ्र उच्च शिखरें मेघांत सम्मीलित
जाती उंच नभांत वृक्ष झुलुनी हे पालवी-वैभवीं
चित्रें नील नभःपटींच हिरवीं रेखाटिलीं भासती !

सोपानें शिखरें नभांत चढण्या एकावरी एक तीं!'
या दृश्यांतुनि दिव्य ज्या प्रकटिसी चैतन्यरूपाप्रती
मन्त्रस्फूर्ति तयामुळें मुनिमनीं होई तदा जागृत
सत्यें ज्यांतिल विश्व विस्मयभरें वन्दीतसे साम्प्रत !

अव्यक्तांत अनन्त उंच हृदयें गेलीं तयांचीं किती
तें उत्तुंग तुझीं असंख्य शिखरें विश्वास का दाविती?
जी तत्संस्कृति ठेवि त्याग-कळसा विश्वावरी प्रेरक
केलें भव्य तिचेंच का तव मिषें ईशें चिरस्मारक?

***

भूमीचा शिशु तूं, तुला कटिवरी घेऊन ती हर्षली
माथा टेकिसि झेप घेउनि परी स्वर्देवि-वक्षस्थलीं !
मेघांच्या विमलांचलीं सित तिच्या झाकून घेसी शिर
स्वर्भूसंगम दिव्य हा घडविसी मांगल्यदायी चिर !

मडगांव, मार्च १९२८.

## पाहूं नकोस !

[जाति–नवती]

अचल राहुनी श्वास रोधुनी
पाहुं नको भावपूर्ण नयन रोखुनी !

चारुतायुता विनत तव मुखा
उजळितसे मन्द मंजु हास्यचन्द्रिका

किरण नाचुनी देति पसरुनी
तरल सलिललहरिंवरी मधुर मोहिनी !

तव मुखीं तसें चान्दणें फुले
हृदयजलावरि मम तें चमकुनी खुले !

गगनिं प्रकटुनी लपतसे क्षणीं
श्याम घनाआड वीज भुवन उजळुनी

नयन-नभिं तुझ्या कृष्ण बाहुल्या
ढगांपरी धरिति वीज हृदयिं आपुल्या !

बिजलि ती मनीं शिरुनियां क्षणीं
दीप्ति भरी तिमिरमग्न हृदयरंगणीं !

चरण खिळवुनी भान नुरवुनी
ती विद्युल्लहरि जाय देहिं खेळुनी !

चित्त बावरे सम्भ्रमें भरे
आवेगहि हृदयींचा मुळिं न आवरे !
अचल राहुनी श्वास रोधुनी
पाहुं नको भावपूर्ण नयन रोखुनी !

मडगांव, ता. १४-८-२८.

---

# आशंका

[ वृत्त–शार्दूलविक्रीडित ]

स्पर्शे अल्प पदांगुली प्रभु ! तुझी
पाषाणखण्डाप्रती
तों त्यांतून उभी विनम्र पुढती
ठाके अहिल्या सती !
माझ्या हृत्कमलीं विराजित सदा
आहे तुझी मूर्ति ना ?*
कैसा दास तुझा तरी पतित हा
राहे असा पावना ?

मडगांव, ता. ३-५-२९.

* ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति—भगवान् श्रीकृष्ण.

# आसवांची ओंजळ

[ वृत्त–शार्दूलविक्रीडित ]

माते ! मूर्ति मनोमया क्षण तुझी या चित्तसिंहासनीं
ध्यावी स्थापुनि पूजनांत रमुनी येतां असें मन्मनीं
मी अन्तर्मुख नेत्र झांकुनि करीं त्वन्मूर्ति कल्पावया
तों अन्धार दिशादिशांतुनि मला धावून ये खावया !

तूं जासी जननी ! मला न कळतां लोकान्तरालागुनी
ठेवाया हृदिं नेत्र अक्षम यदा मूर्ती तुझी कोरुनी
आतां स्वप्नचि रम्य विस्मृत जणू तो काळ वाटे मला
ध्यानाचा अधिकारही न तुझिया ईशें मला ठेविला !

सामूग्री तव पूजना जमविली निर्माल्य ती जाहली
अन्तर्दृष्टि भयाण शून्य पुढती पाहून भांबावली
अर्पाया तुज आणिली भरुनि जी मी भावपुष्पांजलि
गेली अश्रुजलें भरून, उडुनी श्वासें फुलें आंतलीं !

देव्हाऱ्यांत न मूर्ति ! केविं हृदया मी गुन्तवूं पूजनीं ?
वाहीं ओंजळ अश्रुंचीच तुझिया या रिक्त सिंहासनीं !

मडगांव, ता. ४-२-३०.

## कविमित्रास —

[ वृत्त–वारुणी ]

धाडिसी काव्यान्तरीं तूं बिम्बवोनी अन्तराला
वाचुनी चित्तांत माझ्या खेळली कल्लोलमाला !
ठाकली नेत्रांसमोरी ती तुझी मूर्ती रसेली
नेहमीं काव्यात्मतेच्या स्वीय रंगीं रंगलेली

देह संसारीं परन्तू स्वप्नराज्यीं चित्त खेळे
दाखवीती नेत्र तूझे गुंगिनें ते माखलेले !
ज्या घडी संगीं तुझ्या मी सौख्यदायी घालवील्या
दीप्त होती तत्स्मृतींच्या ज्योति कालें मालवील्या.

जीवना नित्याचिया या क्षुद्र गेलों विस्मरोनी
गोडशा पूर्वस्मृतींनीं भावना ये मोहरोनी !
अन्तरंगें एक झालीं आपुलीं केव्हांच ना हीं ?
लागल्या एका सुरीं या दोन वीणा नादवाही !

झुंजणें दोघांहि आम्हां बन्धनांशीं जागजागीं
कोणिं कोणाला म्हणावें सांग रे स्वातन्त्र्यभोगी ?
गौरवाची अंजली ही कां सख्या ! येसी वहाया ?
सद्गुणांची गुम्फुनी कां घालिसी माला गळां या ?

प्रेम पाही नाहिं त्याही सद्गुणां आत्मीयठायीं
प्रत्ययाला उक्ति येई गौरवोद्गारीं तुझ्या ही !
मी कसा चण्डोल ? मातें स्वैरतेचा लाभ नाहीं
सांपडोनी मी प्रवाहीं चाललों वाहात पाहीं

मर्त्य लोकींचे जिवाला वेढिती हे बन्ध सारे
अन्तरंगीं खोल माझी झांकली काव्यात्मता रे !
कल्पनेच्या व्योमभागीं कोठुनी घेणें भरारी ?
स्फूर्तिच्या पंखांस खेची बांधुनी व्यवहार दोरी !

विस्मरोनी बन्ध केव्हां पाहते स्फूर्ती उडाया
आवळे तो मात्र ! —येती तैं कळा पंखांतुनीयां
काचुनी जातील केव्हां ते तुटोनी, नेम नाहीं,
आदळेल स्फूर्ति खालीं, कांपवी भीती मना ही !

सिन्धुच्या पृष्ठीं तशी ही बाह्य माझी शान्तताही
चित्त माझें क्षुब्ध राहे नेहमीं अन्तःप्रवाहीं !
छे, नव्हे ! ज्वालामुखी हा, आंत नाचे तप्त लाव्हा,
वाव तन्मुक्तीस नाहीं ! केविं लाभावा विसावा ?

दाटुनी चित्तांत माझ्या सारखे येती उमाळे
दाबुनी दाबून ओझें अन्तरीं त्यांचेंच झालें !
मागुती विस्तारला हा भूतकाळाचा सहारा
भावि काळाला पहातां दृश्य हो अन्धार सारा !

कोणती रे तेथ नियती वाट माझी पाहताहे —
त्या भविष्याच्या तमिस्त्रीं, ठाउकें आहे कुणा हें ?
गन्धदानाऐवजीं का औषधाला जावयाचें
रानिंच्या कोनांतलें हें फूल माझ्या जीवनाचें ?

दुःख — दैवी हा अतीथी — जेधवां दारांत येई
पाठवूं विन्मूख कैसा ? — स्वागता गेहांत घेई !
दिव्य भावां अन्तरंगीं खेळवीतो हा विचार
आणि कांहीं शक्ति येई सोसण्याला दुःखभार !

मडगांव, ता. १०-७-३०.

# तुज शोधुं कुठें मी ?

[ जाति–मनमोहन ]

तुज शोधुं कुठें मी प्रतिपळिं जरि ये तव अस्तित्व पटून ?

मधु वसन्त-स्तवन-गानें
लिहुनि हिरवीं करिसि पानें
कर निपुण लेखनीं परि तव कधिंही विलोकिला न अजून !

सुमदलांवर कुसर करिसी
विविध रंगीं गगन भरिसी
परि कलाकुशल तव कुठें कुंचली, मुळीं न येइ कळून.

मांडिसी नभ-मखमलींत
दागिने निज रत्नजडित
मी पाहत बसणें दिपुनि ! —शक्य मज काय अधिक याहून ?

यौवनाची कान्ति तुझिया
दिसत फुलत्या फुलांतुनियां
तव श्वास गन्धमय स्फुरति त्यांत, परि मनिं सलतें तव न्यून !

गर्द राईमाजि हाले
पदर हिरवा तव झळाळे
सळसळुनि हासती पानें मजला जातां मी धावून !

गायनाची गूणगूण
पैंजणांची रूणझूण —
तव उत्सुकवी मज निर्झरांतुनी हृदयान्तारिं उमटून

वायुलहरींतून येसी
हळुच करिसी स्पर्श मजसी
दिङ्मूढ होउनी स्थिरावतों मी, तों जासी निसटून !

चंचला तूं अन्य चपला
कवण रूपीं पाहुं तुजला ?
कां नटराणी ! तूं नवनव रूपीं ऐशी येसि नटून ?!

मडगांव, ता. १३-५-३०.

## काव्य स्फुरतांना —

[ छन्द–ओवी ]

वातावरण चुम्बुनी गुणगुणे या अन्तरीं
गोड गाणें कांहीं तरी.

किती दुःखशिला चित्तीं —क्षणीं उमळे निर्मळ
झरा खाळून झुळ्झूळ !

हृदीं पसारा पानांचा माजे, तोंच दिसे कळी
फुले पाकळी पाकळी !

मृदु वायुलहरींनीं गुंगे मन्द आन्दोलनीं
पुलकित क्षणोक्षणीं

भावनांचे भुंगे घेती कळीभोवतीं रंगण
सूर अखण्ड भरून

नाना कल्पना-पांखरें चिंवचिंव मधुस्वरें
नादविती नभ सारें !

नाभिकमलीं कस्तुरी ! हुंगुनीयां तिचा गन्ध —
माझा मीच वेडा धुन्द !

ता. १३-१०-२९.

## दोन पावसाळे

[ जाति–दिण्डी ]

वळणवळणांनीं किती वांकलेली
थेट दारीं पाऊलवाट गेली
नित्य-संवयीनें चालतात पाय
मुळीं भानावरि तयाची न काय !

निबिड मेघांनीं गगन झांकियेलें
नाच चपलेचा मधुनिमधुनि चाले
क्षणचि तेजीं चमकून वस्तुजात
तिमिर घनतर मग भरे दशदिशांत !

सृष्टि त्याला परि लुप्त होय सारी
नयनिं खेळे मुख एक मनोहारी !
त्यजुनी तनुचा पिंजरा धांव घेई
हृदय-रावा पोंचला कधिंच गेहीं !

वीज लवली अवचीत अन्तरालीं
आणि अन्धारी पान्थनयनिं आली
धार मुसळी तों मार देइ भालीं
तोल गेला ! .... मग जाणिवहि निमाली !

*       *

## दोन पावसाळे

उष्ण बिन्दुस्पर्शनें उघडि डोळा
गृहिणिनयनींचा बघे पावसाळा
चमक मोदाची अश्रुसरींतून —
खेळलेली तों तया ये दिसून !

क्षणीं वाटे आराम ; पथींची ती —
स्मरुनि घटना विस्मयें वदे चित्तीं,
"पावसाळ्यांमधिं उभय भेद भारी
एक मारी आणखी दुजा तारी !"

मडगांव, ता. ११-६-३०.

# वत्सल भीति

[ जाति-संगम ]

लपवुं मी किती तरि तुला ?
तान्हुले, लपवुं किती मी तुला ?

पदरांत तुला झाकिली
तरि दीप्ति किती फाकली !
गगनश्रीच्या अंचलीं
झाकली जशि खुलते शशिकला !

लपविलें तुला मीं जरी
निज मंजु वचांनीं तरी
पटविसी जनां अन्तरीं
इथें कीं पर्णान्तरिं कोकिला !

किति तशांत तूं अवखळ
सरकाविसि हळु अंचळ
कळि जणु पानांआडिल —
लतेच्या, डोकावे चंचला !

लागेल दृष्ट तुज, भितें
ना सुचे करूं काय तें
आलिंगनिं तुज झाकितें
चुम्बनीं या तव वदनेन्दुला !

मडगांव, ता. २२-७-३०.

## प्रभात-पूजा

[जाति–अवनी]

अविरत जलवृष्टि-मयी यामिनी निमाली
तळपत मृदु उदित नभीं शान्त अंशुमाली !

लखलखतें नीलोज्ज्वल
मुकुरासम गगन विमल
स्वर्णतेज पूर्वेतिल — वोसण्डत खालीं

वाहुनियां खळखळ जल
धुउनी मल नेइ सकल
होइ उजळ अवनीतल — या मंगल कालीं !

सृष्टि जणू स्नान करुन
त्यजुन मलिन जीर्ण वसन
परिधानच करि नूतन — शुचिर्भूत झाली !

बालभानुबिम्ब करीं
आरतीच सृष्टि धरी
त्रिभुवन-मन्दिर-दारीं — उभी भक्तिशाली

स्निग्ध, सुप्रसन्न, शान्त
फाकुनियां ज्योति-कान्त
मधुर सौम्य तेज खुलत — स्नात भालिं गालीं !

अर्घ्य देत प्रपातांत
विहगमुखें गीत गात
वेलि-करें सुम वहात — पूजि विश्ववाली !

मडगांव, ता. ५-८-३०.

---

# दिन-यामिनी

[ जाति-मंजरी ]

(दोन कणिका)

१

बघ जगच्चित्र हें रम्य, कधींपासुनी —
भंगिलें तमानें काजळ वर फासुनी !
कुंचला आणि तव सप्तरंग उज्ज्वल
घेऊन रवी ! ये तेजोमय तव करीं
तें चित्र उमटवीं फिरुनि पटीं लवकरी !

२

रवितेज तीव्र साहणें असें कुठवरी ?
ये, पंख पसरुनी निशादेवि ! सत्वरी
गगनांतुनि वेगें ये गे झेपावुनी
या तळमळणाऱ्या पृथ्वीगोलावरी
पंखांची शीतल स्निग्ध सावली करीं !

ता. २२-१-३३.

# विनवणी

[ जाति–दिण्डी. ]

सख्या ! पायीं तव एक मम विनंती
कान हृद्याचे करुनि ऐक रे ती !
नको आम्हां हव्यास वैभवाचा
तृप्ति देवोनी प्यास घ्यावयाचा !

दो मनांच्या लाविली अंगणांत
करें पुलकित जी मुग्ध यौवनांत,
वैभवाच्या छायेंत प्रीतिवेल
वाढ खुंटुनि कधिं न ती तरारेल !

सौम्य गरिबीचें ऊन कोवळें तें
यावयाला भर हवें या लतेतें
हृदय ओथम्बो मधुर भावनांनीं,
पालवेलच मग वेल टवटवोनी !

समाधानाचे श्वास — मन्द वारा
ताप हरुनी देईल तिज निवारा
सौख्यदु:खीं जें नयनजल गळेल
तिला जीवनरस सदा तो मिळेल !

धनाभावाची कां उगीच खन्त ?
सख्या ! निर्मूं नित जीवनीं वसन्त.
गीम न कधीं ही वेल करपवील
आणि पालवि नच शिशिर हरपवील !

सौख्य सेवूं अव्याजमधुर सारें
कृत्रिमाचें परि नको मुळीं वारें
प्रीतिलतिका मग बहरतां फुलांनीं
तयां आजीवन विकसवूं जपोनी !

ता. २४-४-३१.

## गानमूर्च्छना —

[ जाति–मोहिनी ]

सम्पवीं न बाले ! अपुलें नादरम्य गान
भंगवीं न भावसमाधी, जागवून भान !

मदिर भावनांचें खुललें चान्दणें विलोल
लेइ फुलुनि रोमांच-मळा दंव-तुषार गोल !
मोहमुग्धता मोहरली अन्तरांत खोल
सुरांसवें तरळत जाई जीव एकतान !

गान भिनुनि प्राण जहाला विरल हळूवार,
चन्द्रिकेंत रमली जणु कीं झुळुक मन्द गार,
सूर पंचमीं तव चढतां करि नभीं विहार
तान-कम्पनांनीं बनुनी तरल-कम्पमान !

किरणिं जेविं इन्दु उमलवी मुग्ध कमल-फूल
स्वरें एकएक फुलवुनी पाकळी मलूल
पूर्ण हृदय-शतदल आतां डुलविसी प्रफुल्ल
त्यांत होइ स्वरमय मूर्ती तव विराजमान !

वरी सृष्टि कान्ति नवी, तव उमटतांच तान
हसे स्वर्गसुषमा निमिषीं जिथें माळरान !
जिवाचें न झालें अजुनी परी समाधान
गानमूर्च्छनेंत विरूं दे विश्व दृश्यमान !

ता. २१-५-३१.

# अन्तरींची खळबळ

[ वृत्त–शार्दूलविक्रीडित ]

आतां गर्जित सिन्धुचें हळुहळू येऊन मन्दावत
अंगाईत विलीन होय ! — लहरी अंकावरी निद्रित !
ताराचित्रित पांघरून दुलई विश्वा निशा जोजवी
वारा हिंडुनि श्रान्त होउनि निजे वृक्षांचिया पल्लवीं

निद्रेची नयनां करांगुलि हळू स्पर्शूनियां वत्सल
सारे ताप निवून जीवजग हें झालें असे निश्चल
स्वर्देवी रुजवी कुणी टवटवी आतां तदीयान्तरीं
माझें चित्तच मात्र हें खळबळे प्रक्षुब्ध सिन्धूपरी !

चिन्ता व्यग्रपणामुळें दिनभरी ज्या पारख्या या मना
शेजेला तनु लावितांच, फिरुनी देती अतां यातना
जेवीं ओसरतांच पूर वरती येती शिला आंतुनी
पक्षी वा घरट्याकडे परतती सोत्कण्ठ सायन्तनीं !

चाले ताण्डव सारखें खवळुनी हृत्सिन्धुचें, ना खळे
किल्लेकोट तडीस जे उभविले, पाया तयांचा ढळे !
जेव्हां पाडिल कोसळून पुलिनीं लाटाप्रहारें तयां
का तेव्हां तरि शान्त होइल जरा हा भूक भागूनियां ? !

मडगांव, ता. १०-९-३१.

# सृष्टीच्या अंगणांत

[ जाति-सूर्यकान्त ]

त्यजुनि घराची बन्दीशाला, चला खुल्या अंगणीं सृष्टिच्या
तेज, वायु, जल जिथें निरन्तर रंगतात रंगणीं.

स्वैर खेळकर झुळुक काळजा नाचूं द्या बिलगुनी सारखी
वेडावुन मन इकडेतिकडे पळुं द्या तिजमागुनी !

डुलवि झावळ्या —' या या ' म्हणुनी खुणावितो माड तो समोरुन
व्याकुळ होउन शीळ खुणेची वाराही घालितो !

वातचक्र बोलावित फुगडी खेळाया गरगरां स्वतांशीं
गुंगत गुंगत गिरकी घेऊं धरुनी त्याच्या करां !

ही न पोकळी, — चैतन्याचें भाण्डारचि हें भरे पुरेपुर
दरिया किंवा अथांग त्याचा, अवगाहन करुं बरें.

मांगल्याचें छत्र आमुच्या शिरावरी अम्बर विलसतें
प्रकाश जीवन जगतीं जेथुन अवतरती तत्पर.

नमवुनि शिर पसरुनी पर्ण-कर सादर तरु आदरें झेलण्या
अज्ञातांतुन जीवजगीं ही करुणा जी पाझरे !

निळ्या नभाच्या छताखालती सारी हिरवळ हसे सृष्टिची
पावित्र्याच्या चिरसहवासीं सौन्दर्यचि हें वसे !

श्वासांनीं निज रिती आमुची ही काया-बांसरी जो भरी
सुरेल जीवन-संगीताची अक्षय वृष्टी करी !

विविध रूपरंगांत तोच या अनन्त शून्यांतुन अनादि
सौन्दर्याची सृष्टि उभवितो साकारा मोहन.

या सृष्टीशीं एकतानता पावो सहजीं मन आपुलें
सौन्दर्याच्या उन्मेषांनीं नटेल मग जीवन.

सळसळ गाती तरू डोलुनी झुळझुळ झरते झरी नाचरी
गीत आपुलें त्यांतच मिळवूं गाउन मुक्तस्वरीं.

अनन्तपथिंचा पथिक वायु हा सन्देशा घेउनी कोणत्या
अपार दरिया ओलांडुनियां ये पैलतिराहुनी ?

फिरे स्वतांला स्वयें हरवुनी तन्मय कां, ना कळे असा हा
गूढ तया हें घेऊं पुसुनी गळां घालुनी गळे !

दिनावसानीं वेळेवरुनी पैल न्याहळूं दुरी तारका
गहन नील पटिं केविं लुकलुके एकेकच लाजरी !

ता. २७-२-३१.

# बिजेची कोर

[ जाति–दिण्डी ]

नील गगनीं ही कोर तारकांत
जुई-वेलीवर कळी जणु फुलांत !
अजुनि अस्फुट जरि हिचें सर्व कांहीं
दलीं मिटल्या नच गन्ध बद्ध राही.

कृष्णमेघांतुन काढि पथ जपून
ध्येय उज्ज्वल जणु निराशेमधून !
दीप्ति लपवाया वाढती पहाती
विमल तेजानें उजळि परि तयां ती !

पारिजाताचा मुग्ध मधुर गन्ध
हिचें तैसें चान्दणें शान्त मन्द
हिला सौदामिनिसम न कळे नाच
कुठुनि लाविल रविपरी जगा काच ?

तेविं तारांच्या कशा नेत्रलीला
सरळहृदयी कळणार भाबडीला ?
जसें मन्दस्मित युवतिचें सलज्ज
हृदय हलवी हळुवार, हिचें तेज !

## नन्दादीप

कला जेव्हां विकसून पूर्णतेनें
वैभवानें विलसेल कोर तेणें,
कान्ति शान्तीसह तिची अवतरून
जगा चुम्बुनि उठवील ग्लानिंतून ;

विश्वहृदयाच्या अणूअणूंतून
काव्यमयता आणील उमलवून !
अशी येइल कधिंतरी पुनव-रात
असे धरुनी ही आस अन्तरांत !

मडगांव, ता. २७-३-३१.

# तळमळ

[ राग—कानडा ]

पसरली ही चौफेर    रात भयाण अन्धारी
मिणमिण जळे दीप    पर्णकुटिकेच्या दारीं !

झोत लागूनियां वाटे    क्षणोक्षणीं विझालासा
आणि तयासवें माझा    जीव होय तोळामासा !

नाहीं ठावें मजलागीं    कसा येशील कोठून
अवधान डोळां कानीं    येई सगळें सांठून !

नाचऱ्या या ज्योतीपरी    डोळे चंचल बावरे
कांपत्या सावल्यांपरी    मनीं काहूर वावरे !

मार्गीं साऱ्या येरझारा    घालुनीयां दृष्टी भागे
गाढ निशा जशी जगा    ग्लानि देहा ग्रासूं लागे

नयनांच्या दारापाशीं    घोटाळते पहा नीज
डोळे येती पेंगळून    किती थोपवूं रे तिज ?

***

अहा व्यक्त होत येई    हळूहळू तमांतून
रूप हृदीं रेखिलेलें    भाव जाती चमकून !

वाणी मुकी ! दृष्टी भुकी    राही त्यावरी खिळून
तोंच वारा झोंबून ही    स्वप्नतन्द्री, ये कळून !

खरें मानूं पाहीना हें    कांहीं केल्या मन परी
शून्य दृष्टी न्याहाळीत    तीच दिशा पिशापरी

कळ लागून मानेला    शिर खालीं झुकतसे
देठ बावतां साळीक    अधोमुख होई जसें !

*
* *

अस्फुटशा गन्धापरी    येई दुरून चाहूल
मोदें हृदय भाविते    तुझें वाजलें पाऊल !

उत्कण्ठित हृदयाची    धडधड तीही ! — हाय !
स्तब्ध रात, एकाग्रता    यांनीं झाली शब्दप्राय !

*
* *

दिसतील पदचिन्हें    उद्यां जागतां जवळ
वाढविशील रे अशी    वृथा माझी तळमळ !

तहानेल्या जीवापुढें    निर्मिसी कां मृगजळ ?
तुझ्या करुणेच्या जळीं    करीं हृदया कमळ !

मडगांव, ता. ७-६-३१.

## दुपार

[जाति–कोकिला]

विश्व पेटलें सारें भवतीं
चढे रौद्र तेजाला भरती
ज्वालांवर ज्वाला धगधगती
झळा तापल्या चाटुनि जाती
त्या ज्वालांचीं नभांत होती अग्रें नील विलीन !
सिन्धुलहरि कम्पित चमचमती
रणरण करितें ऊन सैकतीं !
झुळुक येतसे तुरळक पळती
तरुपर्णें सळसळुनि नाचती
क्षणैक उज्ज्वल क्षणैक श्यामल यापरि झगमगती !
सावलिसाठीं तळमळतें मन
प्रखर तीव्र उज्ज्वलतेनें दिन—
असह्य तळपे; मिटतात नयन
झापड पडते सर्वेंच येउन
भरे ग्लानिमय निःस्तब्धपणा उन्हासवें जगतांत !
घरट्यांत दडे विहंगावली
लपे वस्तुंची तळीं सावली !
महालांत श्रीमन्ती निजली
सुखोपचारीं शीतल रमली
कामकरी कुणि परि रस्त्यावरि खपती निथळित घाम !

मडगांव, ता. १६-४-३२.

# आत्मवंचिता

[ वृत्त-शार्दूलविक्रीडित ]

"जागा या हृदयीं नसेचि तुजला" मी निक्षुनी बोललें
किंचित् ये तव सुप्रशान्त वदनीं बिम्बूनियां म्लानता
सायंसूर्यकरांपरी करुनियां तूं खिन्न मन्दस्मिता
माझें मंगल चिन्तुनी परतसी! मन्दावलीं पावलें!

होतां आठव कालवून हृदयीं ओलावती लोचन
जे माझें स्तुतिगीत गुंजत अली घोटाळले भोवतीं
झालें वैभवरूपगर्वित मनीं, पाहूनि रे त्यांप्रती
अन्तःसृष्टिमधें धुक्यांत लपलें माझेंच अन्तर्मन!

लीलेनें झिडकारिलें तुज सख्या! बोलूनियां निष्ठुर
आतां तें वितळे धुकें!—मधु सरे, भुंगे पळाले दुरी!
पाहीं आज वळून, तों विहरसी तूं—तूंच हृन्मन्दिरीं!
त्या ओठीं परिहास-हास्य मृदु!—तें मारी जिव्हारीं शर

देऊं दोष कुणास? वंचित मला ना मींच केलें असे?
तूं कोठेंहि रहा सुखीं!... परि वदूं हेंही मुखें या कसें?

मडगांव, ता. ११-३-३१.

# यौवन-जागृति

[ जाति–मुद्रिका ]

कोणत्या स्वप्नमय जगीं मला जागृति —
ये अशी अकल्पित ? सृष्टी रूपान्तरिता भोवतीं !

कासया अकारण मधुर करुणरागिणी
गुंगवित स्रवतसे ऐशी अनुरणुनी हृदयांतुनी ?

ही काय कळेना उणिव जाचते मना
का असे वेदना किंवा सौख्याची संवेदना ?

वनहृदिंचें कूजित वना करी कम्पित
कुणितरी अन्तरीं तैसें करि वसनी मज विस्मित !

स्पर्शला हृदयसृष्टिला वसन्तानिल
मधु गन्धि मातली मुग्धा, उमलुनी कळ्या आंतिल !

मी नकळत बसलों तुझी वाट पाहत
ही उत्कट कुठुनी चित्ता आतुरता करि आहत ?

तव नामरूप ठाउकें मला ना जरी
तूं सुपरिचिता परि माझी, हा भाव — नवल ! — अन्तरीं

कधिं जरा स्थिरावत हृदयतरंगांवरी —
ये एक चंचला छाया, भंगते क्षणीं ती परी !

## नन्दादीप

अवतरण तुझें होऊन मदिय जीवनीं
चन्द्रिका मोहमय केव्हां वितरिशील तं या वनीं ?

मी शून्य दृष्टि शून्यांत दूर लावुनी
विमनस्क कण्ठितों काळा, या बसुनी वातायनीं !

रंगती छटा नवनव्या क्षणोक्षण मनीं
जणु रंग बदलते व्योमीं तरळतात सन्ध्याघनीं

तव लज्जारंजित छबी मधुर हांसरी
लपलेली सन्ध्यारंगीं चमकतां दिसे अम्बरीं

मम उत्सुकतेचे गमे पंख लावुनी
वनदेवीपरि ज्योत्स्नेचें येशील वसन लेउनी !

हिंडसी तारकादीप घेउनी करीं
मज शोधित विश्वीं का तूं, पसरते यदा शर्वरी ?

कल्पनासृष्टि अज्ञात जशी धुंडुनी
तुज अशान्तभावें मीही हुडकितों कधींपासुनी !

मडगांव, ता. २४-८-३१.

# जीवनौघ *

[वृत्त–शार्दूलविक्रीडित.]

नेत्रोन्मीलन जाहलें प्रथम जैं उत्तुंग शैलावरी
त्याली सुन्दर रम्यशा हिरवळी पाहून खालीं दरी
मी उच्छृंखळ जीवनौघ पुरता गेलों मनीं मोहुनी
आलों घेउनियां धडाधड उड्या खालीं क्षणीं तेथुनी !

कांहीं काल मला गमे जणु दुज्या मी नान्दतों नन्दनीं
सौख्यप्रेमच वर्षतें मजवरी कीं वस्तुजातांतुनी !
तारांच्या सुमनीं खचून भरल्या आकाशगंगेपरी
शोभा देति मला तरू निज फुलें वाहून माझ्यावरी

दो तीरीं गवतें लवून गुजतां कानांत कांहींतरी
रोमांचावलि थाटली तनुवरी, हेलावलों अन्तरीं !
प्रेमानें जलबिन्दुंनीं भिजविलें मींही तयांना कधीं
गेलें लोपुनि हाय ! आज परि तें सारें अतीतामधीं

आलों धावुनि मी खळाळत पुढें, सोडून त्या नन्दना
कोठें ना स्थिर राहणें, मज जडे हें घातकी वेड ना ?
मार्गी पायघड्या मऊ हिरवळी आतां न त्या लाभणें
आतां खांचखळ्यांमधून खडकीं हा देह ठेचाळणें !

आक्रन्दूं फुटतां उरीं तरि किती ?— फेसाळलें मन्मुख
दैवें नन्दन लाधलें !— परि तया मी जाहलों विन्मुख !
लागे किर्र भयाण रान दुथडी ! निःस्तब्ध ये साहणें —
साऱ्या अन्तरिं वेदना दडपुनी ! मी मूक त्याकारणें !

* जीवन = १ जल; २ जीवित.

झाडें झाकळिती मला पसरुनी फान्द्या वरी आपुल्या
त्यांच्या नाचति वायुकम्पित जलीं काळ्या किती साउल्या !
देती भीषणता मला अधिक त्या हालून सर्पाकृति
झालों प्रौढ, उदास ; सन्थ बनली माझी अकालीं गति !

ये रेताड उजाड माळ पुढती ! तापून सूर्यातपें —
ज्वाळा सोडित उष्ण उष्ण मजला शोषावयाला टपे !
रानोमाळ किती फिरूं वणवणा मी सागरा ! यापरी ?
लागे ज्या तव तीव्र ओढ, मन तें आतां न ठेवीं दुरी

सन्ध्या जाय हळूहळू विरुनियां जैशी निशालिंगनीं
आरक्त स्वमुखा कुशीमधिं तिच्या बालेपरी झाकुनी
पुष्पांतील सुगन्ध मन्द विखरे जैसा दिगन्तान्तरीं
माझा सान्तपणा अनन्त तुझिया रूपीं विरो त्यापरी !

साऱ्या वृत्ति मदीय एकवटल्या आतां तुझ्या चिन्तनीं
जीवाचा लय गूढ अश्रुत तुझ्या संगीतकीं लागुनी !
आतां जीवन-सागरा ! किति तरी आहेस तूं दूर रे ?
प्रेमें निर्झरिणीस क्लान्त कधिं या घेशील पोटीं बरें ?

मडगांव, ता. २१-८-३०.

# शापित अहल्या

[ जाति–सूर्यकान्त ]

जिवापलिकडे सती ज्यास ती जपली आजीवन
अधम चालला हाय ! लुटुनि तें पावित्र्याचें धन

धिक् सुरेन्द्रपद, धिक् त्या सिद्धी ज्या होती योजित
करावया कैतवें कलंकित पतिव्रता-जीवित !

इन्द्रजालिं गुन्तली अहल्या ! कसें कळावें तिला
पुष्पमाळ नच काळसर्प हा गळां असे रुळविला

इन्द्र निघाला लपवित यत्नें निज वृत्ती प्रमुदित
पतिभ्रमें त्या सती प्रीतिनें सलज्ज अवलोकित !

पर्णकुटीशीं स्वीय परततां सरितातीराहुनी
दृश्य अकल्पित बघुनि समोरिल थबके गौतम मुनि

होई दृष्टादृष्ट तिघांची ! क्षणीं तया भासली —
भीति, चकितता, क्रोध विकारत्रयी मूर्त ठाकली !

सुरेन्द्र खिळला फणीन्द्रापरी मन्त्रमूढ हतबल
आणि जाहली शिलामूर्तिसम अहल्याहि निश्चल !

ऊन कोवळें पळे स्मिताचें, सोज्ज्वळ वदनावरी —
वादळसूचक दमळ पसरलें ! — मळभ भरे अम्बरीं !

मुनिनयनांतुनि निघती ठिणग्या भडकुनि कोपानळ
काळवंडलें इन्द्रवदन, ये सतिच्या नयनीं जल

शान्ति भयद तों भंगुनि सतिच्या इन्द्राच्याही शिरीं—
शापवाणि कडकडे, —वज्र जणु त्याचें वृत्रावरी !

निमुट ऐकते सती बापुडी "....दुःशीला तूं शिला—
होउनि पडशिल रामपदांनीं देह न जों स्पर्शिला !"

बने तत्क्षणीं शिला ! राघवा हाक मुकी देतसे
आणि पदांची पावन त्याच्या करित प्रतीक्षा बसे !

ता. ३-२-३१.

# चन्द्रकिरण

[ जाति–स्वर्गंगा ]

इन्दु अम्बरीं शिरतां आम्ही दूत तयाला अनुसरतों
क्षणिं अवनीवर उतरुनि भरभर दाहि दिशा व्यापुनि उरतों
तरुशिखरांच्या तृणांकुरांच्या कुणी पहुडती शय्येंत
कुणि दोल्यावर जललहरींच्या मौजेनें झोके घेत !
निशिगन्धाच्या मुग्ध कळ्यांना कुणी बैसती उमलवित
कुणी करपल्या लतांस करिती संजीवनिनें टवटवित !
गवाक्षांतुनी उघड्या शिरुनी कुणी चोरुनी विलोकिती
प्रणयक्रीडांतुनि जी प्रकटे प्रियकर-प्रणयिनिची प्रीति !

*
* *

अमृत शिंपितों मृदुल करांनीं शान्तिमन्त्र हळु जपूनियां
चराचरावर मोहनमाया घालुनि विनटवितों दुनिया
अर्धस्फुटता, अर्धगूढता — जणु कोडीं स्त्रीहृदयाचीं !—
जळींस्थळीं अशि सांडण करितों रहस्यमय सौन्दर्याची.
परिमल-वर्ण-स्पर्श-सुरांतिल माधुरिचा संगम करुनी
स्तब्ध वायुवर तरंगवीतों शून्य अन्तरालामधुनी !
वनराइवरी झूल पांढरी, तळींहि काळी चन्द्रकळा
पसरुनि करितों बहाल तिमिरा महाल नवलाचा असला !

*
* *

येतां बघुनी आम्हां स्वमनीं खेळायाला उत्सुकल्या
सख्या सावल्या झणिं ज्या लपल्या कुंजांतुनि झाडीमधल्या,

शिवाशिवीचा खेळ मांडितों बालवृत्तिनें तयांसवें
वरिवरि आम्हां परी हरविती दावुनियां कौशल फसवें
अखेर उतरुन फटीफटींतुन पालविच्या अलगत लपत
हळुच झाकुनी नयन करांनीं विस्मित करितों सख्यांप्रत !
लपंडाव हा पुरा करुनियां मग झिम्मा खेळत बसतों
कृष्णनभान्तरिं तारक त्यापरि त्या समयीं आम्ही दिसतों !

* * *

गाउं लागतों निःशब्दाच्या निःस्तब्धाच्या तालसुरीं
आणि सृष्टि ही डोलत राही तन्मय गानीं बनुनि पुरी
चढत्या रात्रीसवें रंगतें मूक आमुचें संगीत
श्रवतां श्रवतां धरा तरुलता होती लीन समाधींत !
मूक विरल ते सूर सांचुनी येति गोठुनी मग गगनीं
जगिं धूसरता गहिरी भरिती अथांग शान्ती नान्दवुनी

* * *

दूर दिगन्तीं पुसट झळकतां उषादेविचा ध्वज धवल
क्षणीं पसारा कवळुनि सारा परत वळवितों पाऊल
गुन्तुनि मोहीं अन्तर राही म्हणुनि चुकुनि जे कुणि उरती
सुखतन्द्रेमधिं गुंग, फुलांवर वा मृदु तृणशय्येवरती
उषा-सजण अरुणाची पडतां नजर तयांवर कुपित अती
तेजोमय तनु वितळुनि होई पाणी, दंव ज्या जगिं म्हणती !

मडगांव, ता. १-१-३१.

# अलक्षित प्रेम

[ वृत्त—शार्दूलविक्रीडित ]

संकोचें, कधिं संशयें : ‘विफल ही नाहीं अपेक्षा तर?’
बाले ! व्यक्त करावया न धजलों माझें कधीं अन्तर
प्रत्याशेविण केविं धीर हृदया यावा बरें कातर?
केला धीर कधीं — परन्तु हृदिंचें हो लुप्त ओठावर !

होतां कोंडियली अनावर परी हृद्भावना व्याकुल,
साध्याही वचनांत ती उमटुनी तीं होति कम्पाकुल !
त्यायोगें चमकून नेत्र अपुले काळे वरी लाविसी
माझे भेटुनि नेत्र दीप्त, निमिषीं ते पाहती भूमिसी.

स्पर्शें ओझरत्या तनू लहरली हृत्सिन्धु हेलावुनी
माझें हृद्गत, — वीज ती न तुज का नेली तयें वाहुनी?
या साऱ्यांत न मूक भाव दिसले माझे तुला का कधीं?
व्हावे नष्ट हृदीं अलक्षितच ते, योजी असें कीं विधी?

बाले ! होशिल जीवनीं सहचरी तूं आज अन्याचिया
येथें पूर्णविराम देइ नियती अव्यक्त प्रेमास या !
झाली का मजकारणें स्थिति तुझी माझ्यापरी अन्तरीं?
—राहो प्रेम अपूर्त—धन्य मजला मानीन, बाले, तरी !

ता. ३१-८-३१.

# कवितेचा उगम

[जाति–मोहिनी]

लेखणी स्रवेना कविता-झरी ही सलील,
हिचा उगम रसमय हृदयीं समरसत्वशील !

जिवा जडविं जलपृष्ठाची विमल तरल वृत्ती
स्निग्ध भाव-हिरवळ ताजी सदा ठेव चित्तीं
झुळुक मन्दही मग सौन्दर्यानुभूतिची ती
मृदु कलाविलास-तरंगीं हृदय तव भरील !

त्यजुनि निम्न जगता जाती उंच माड, बांस
हृदीं स्फूर्ति सांठविती जी तिथें आसपास
स्वैर लागती मग तन्मय डुलत गावयास
हृदय तवहि गाइल जरि ती भूमिका वरील.

घुमे अल्प आघातेंही कांपुनी सतार !
—कसें कम्पनाविण गाणें तरी उपजणार ?—
दीनदुःख अनुकम्पवितें जरी हृदय-तार
स्वरावली हृदयंगम तरि सहज पाझरेल
आणि विश्व मोहुनि गर्दी पदीं तव करील !

मडगांव, ता. ६-९-३१.

# ध्रुवतारका

[ जाति – प्रणयप्रभा ]

झणिं पाउल आतां उचल वरी
स्थिर ध्रुवतारेवर नयन करीं !

वाट भरे जरि कंटकिं सगळी
भुलूं नको दुरि बघुनि हिरवळी !
झाकिति फसव्या त्या खोल घळी
जाण, कोवळ्या तृणान्तरीं.

दो बाजुंस डवरले ताटवे
रंग फुलांचे चंचल नटवे
मोह घालिती गन्ध नवनवे
तिथुनि आवरीं हृदय परी !

चंचल दृश्यीं गुन्तव नच मन
रमतगमत पथिं गमवीं काल न
साध्य न तव हें, केवळ साधन
ध्रुव तव अजुनी दूरवरी.

तन्मयता तव पिसेंच गणुनी
हसतिल तुज जन 'वेडा !' म्हणुनी
परि जननिन्दा ती अवगणुनी
तूं बेपर्वा चाल तरी !

मिळेल न तुला मार्गी सोबत
टिकेल न पुढें, जरि ती लाभत
बोजा अपुला तरि शिरिं वाहत
तूंच एकला मार्ग धरीं !

ध्रुवा लपवितिल सुरधनु घन जर
ज्योत तरी तव उजळीं आन्तर
वितळिल जी त्यां निज तेजें खर
धुकें विरवि रवि जेविं करीं !

लक्ष्य एक तव धरिं तीरापरि
— आणि गळाली तनु मार्गी जरि
समाधान हें बाळग अन्तरिं
कीं 'तो भारच होइ दुरी !'

मडगांव, ता. १-६-३१.

# सोक्षमोक्ष

[जाति – रसना]

कर सोक्षमोक्ष आतां    ये तार ही तुटाया
आन्दोलिं संशयाच्या    कां दोलवीसि वायां ?
पाताळ-व्योम-चुम्बी    हे उंच हेलकावे
हळव्या अधीर माझ्या    जीवें किती सहावे ?
डोळ्यांत अन्तराचा    लागे तुझ्या न ठाव
प्रीती तिथें तरंगे ?    कीं हा मदीय भाव ?
देशील कौस्तुभा तूं    हालाहलास किंवा ?
त्या नील सिन्धुपृष्ठीं    तळिंचें कळे न जीवा !
गळिं फास रेशमी हा    वा गुम्फिसी हसून
का सर्वनाश अन्तीं    देशील ओढवून ?
कीं माळ ती ?— न फास ?    उपजे अशीहि आस
कां ओढ लाविसी ही    मागेंपुढें जिवास ?
येतांच मी जरी गे    रंगे उषा मनांत,
कां व्यर्थ संशयाचा    हा मेघ मीलनांत ?
जर नाट्य सर्व, टाकीं    पडदा अखेरचाच
भंगेल रंग, भंगो !    परि हा पुरेच नाच !
डिवचून कां पहासी    पाळीव पोपटा या ?
हा क्रूर खेळ चाले    का चित्त रंजवाया ?
मज उग्र तेज जाळो    परि दूरवीं तमा या
कर सोक्षमोक्ष आतां    ये तार ही तुटाया !

मडगांव, ता. ९-४-३१.

# भाताचें रोप

[जाति – बालानन्द]

स्मरते मजला ती पुरती
सतेज चिमणी तव मूर्ति, —
भूमीतळची निज शेज
किती दिसांची तरि नीज —
त्यजुनी, शिर करुनी वरती
डोकावसि जेव्हां जगतीं !
तेजोमय जग बघुनि खुलें
नवल किती तव वदनिं खुले !
कवाड बंद तुझें असुनी
तुला उठविलें तरी कुणी ?
फटींतुनी कर शिरकवुन
जागविती का रवि पवन ?

❦

शेताच्या मेरेवरुनी
आंब्याच्या सावलींतुनी,
रेशमापरी तकाकती
लंवलवीत तनु तव नवती
रोज विकसतांना बघुनी
आशांकुर नव उदित मनीं

गमे भूमिहृर्दिंची स्फूर्ति
तव रूपें पावे पूर्ति !

❦

लव झुळुकेनें थरथरती
किसलय-कोमल तव पातीं
वरी धरेंतुनि परि सरती
सलील निर्मल सुन्दर तीं !
मातीचे थर केविं तरी
दुरी सारिसी मृदुल करीं ?
कोमलतेमधिं तुझ्या कसें
भेदकपण हें लपुनि असे ?

❦

अन्तर तव नाचे हर्षें
प्रेमळ का वायुस्पर्शें ?
म्हणुनिच वाटे फिरफिरुनी
जाय तनू तव शिरशिरुनी !
सर्वेच कम्पनमय गान
गासी हरपुनियां भान !
तव मृदु हृदयाची तार
छेडितात का हळुवार

कोमल अंगुलिनें झुळुका
गान निघे मग मंजुळ का ?

❦

जोत बांधुनी शेतकरी
कसणी जेव्हां येथ करी
स्वेदबिन्दु त्याचे गळले
हृदीं धरेनें ते धरिले !
मोतीं होई स्वातिजल
बघतां जैसें जलधितल,
तदन्तरीं का त्यापरि ते
रूपान्तर झाले वरिते ?
मग येती बनुनी दाणे
तव कणसीं गोजिरवाणे ?
पात वेष्टुनी रक्षितसे
मोत्यांना शिम्पले जसे !

❦

कीं वत्सल ही भूजननी
तुझ्या मिषें कर लांबवुनी
ओती मनुजाच्या पदरीं
भरुनि मुठी निज भाण्डारीं ?

डिसेंबर, १९३२.

# गोमन्तक-गीत

[ चाल – पोवाड्याची ]

विनम्र घेईं वन्दन पायीं गोमन्तकभूमि
शिर नमवीतां ऊर फुलविते भावमयी ऊर्मि !

प्रति धूलिकणा तुझी अम्हांला असे शिरोधार्य
वस्तुवस्तु तव तेविंच हृदया परम पूजनीय.

उज्ज्वल तव यश गमे जाहलें आज मलूल जरी
मायभूमि ! तूं असती आम्हां प्रियच सदैव तरी !

नयनांपुढती गिरिपरि परि तव दिसतां गुणराशी
हृदयसिन्धु ये उचम्बळोनी, लागे पायाशीं.

पूर्व दिशेला उभा सह्यगिरि आशीर्वच द्याया
उंच उचलुनी भव्य आपुल्या शिखरकरांना या !

पश्चिम-सागर लोळण पायीं घेऊन अफाट
जयगान तुझें अविरत गाई—नम्र पुढें भाट !

सर न कुणा ये दिव्य अशी तव निसर्गसुन्दरता
मूर्त रम्यता तुझ्या तरुलता, गिरि, निर्झर, सरिता.

ठायींठायीं तुडुम्ब भरले तलाव विमल जलें
खुले नीलिमा वरती डुलुनी लाल धवल कमलें !

टवटवीत घनदाट दुतर्फा तरुराजी, मधुनी—
सागराकडे प्रफुल्ल हृदयें धावति किति तटिनी

गम्भीरपणें कान्तचिन्तनीं दंग कधीं बनुनी
कलहास्यानें आसमन्तिचा प्रान्त कधीं भरुनी.

हिरवी हिरवी गर्द पालवी विलसे गिरिशिखरीं
जणु अभिमानें निसर्गदेवी उन्नत शिरचि करी !

हिरवीं-पिवळीं शेतें-कुरणें चोहिंकडे दिसती
सरोवरापरि त्यांवर लहरी आन्दोलत फिरती.

शुभ्र जलाचा दूधसागर-प्रपात विमल अती
—कीं स्फटिकांचा चुरा सांडतो तव पाचूंवरती !

अथवा गिरिजा सृष्टिसखीची ओटी काय भरी?
हिरवळलेली दरी नसे ही,—सृष्टि पदर पसरी !

लुब्ध होउनी कीं नैसर्गिक सौन्दर्या तुझिया
स्वर्लोकींची जान्हवीच ही येई उतरुनियां

सुप्त चेतना शिलांचिया कणकणांत उठवाया
खोल दऱ्यांतुनि चिरयौवनयुत हिरवळ फुलवाया !

फळाफुलांचा बारमासही अक्षय तव बहर
कुळागरांची प्रेमळ पांखर सावलि पसरि वर.

माधुर्याची आम्रवृक्ष तव देतिल ते साक्ष
उंच मनोरे तुझे भासती नारळिचे वृक्ष !

अथवा हे तव विभवमन्दिरा आधारस्तम्भ
उभे कल्पतरु तुझ्या नन्दनीं धरुनि सुधाकुम्भ !

शिळांतुनीही तुझ्या झिरपतें जळ निर्मळ गार
कुळागरांपरि धरि ओलावा प्रति हृदयागार !

ललितकलांची हिरवळ नटवी मनोभूमिकांस
वरती छाया तत्पर द्याया आश्रय पथिकांस !

घन रायांतुनि देवमन्दिरें किती झळकतात
पूर्वस्मृतिंचे तरंग भवतीं वातावरणांत !

राष्ट्रकूटकुल विक्रमशाली तुझेंच सन्तान
कदम्बांचिया साम्राज्याचें होसि अधिष्ठान.

यादव-सेनापति दिग्विजयी मायिदेव वीर
बक्षिबहाद्दर जिवबा नेई ध्वज अटकेपार !

योगिराज सोहिरानाथ तव निःस्पृह कवि सन्त
राजकारणीं कुशल धोरणी रामचन्द्रपन्त

लखबादादा, — आणिक दुसरे तेविं असंख्यात
धीर वीर धीमन्त सन्त तव पुत्र असे ख्यात !

नरवर अजुनी थोर कितीतरि असतिल अज्ञात
गौरवमय परि अस्फुट तुझिया गत इतिहासांत

विस्मृतिपटला आज विरल परि सुपुत्र तव करिती
दिपवि त्यांतुनी पुसट येइ जी गतवैभवदीप्ति.
क्षणैक बघतां वर्तमान मग खुंटतसे आस
'भावि काल तव उज्ज्वल' परि हा अविचल विश्वास !
ती विभवाची, स्वातन्त्र्याची, उत्कर्षाचीही
पहाट मंगल तुझिया क्षितिजीं उगवो लवलाही.
रक्तसिंचनाविना उषा ती उदित जरि न झाली
रुधिर हृदींचें शिम्पुनि आणूं क्षितिजावर लाली !
हृदय—नव्हे, सर्वस्व वाहिलें तव चरणांवरि मी ;
भक्तिभराची घे ही प्रणती गोमन्तकभूमि !

मडगांव, ता. १३-१२-१९२५ व १९२८.

# चिमणा राजा

[जाति – साकी]

गृहराज्यावर गाजवि सत्ता राजा चिमणा एक
जन्मजात हा ! नको कराया यास कुणीं अभिषेक !

कटि आईची मृदुल आपुलें सिंहासन बनवून
मधुर बोबड्या अस्फुट वचनीं सोडि हुकूम तिथून

बैसायाला सुन्दर घोडा त्यास असे काठीचा
परि आवडता अधिक त्याहुनी ताईच्या पाठीचा !

त्या घोड्यावर डौलें बैसे, चाबुक नाजुक हातीं
सहल करोनी देखरेखही ठेवी राज्यावरती.

राजदण्ड जड राजे दुसरे वागविती स्वकरांत
मनें दुज्यांचीं मुठींत परि हा ठेवितसे दिनरात !

मृदुल करांची मिठी सोडवूं येइ न मल्लांनाही
अमोघ याची शक्ति यापरी, उपमा कसली नाहीं.

पराभवाचें लक्षण दिसतां रुदनास्त्रा सोडीत
प्रबल शत्रुही मग त्यायोगें सहजचि होई चीत !

मडगांव, ता. २१-२-१९२९.

# सिंहावलोकन

[वृत्त – शार्दूलविक्रीडित]

देई शीण अतां प्रवास चिर हा जीवास जो नेमिला
मागें मी अवलोकितां लव इथें बैसून विश्रान्तिला
नेत्रीं दाटुनि अश्रु दृश्य पुसुनी तेथील जाई क्षण
तेथें ये न वळूं पुन्हा, दचकवी ही कल्पना भीषण !

मी तन्द्रींतच गुंगलों, कर दिला विश्वासुनी यत्करीं
सांगाती कुणि ते न आज, बघतां येऊन भानावरी !
येई मात्र कळून कीं थडकलों या रानवाटेवरी
कोठें स्वीकृत मार्ग लुप्त क्षितिजीं ? – कैंचा अतां तो परी ?

काळाचा परते न बाण सुटला त्याच्या धनुष्यांतुनी
येतें चित्त उलून सत्य कटु हें दुर्लक्षिलें चिन्तुनी
मागें शून्य, पुढें अदृश्य पथ हा होई तमिस्रेमधीं !
संमोहांतुन या विराम हृदया लाभायचा का कधीं ?

देवा ! दे करुं एकदां फिरुनि रे प्रारम्भ आतां मला
किंवा हासुनि जाचण्या हृदयिंच्या सोसावया दे बला !

मडगांव, ता. ४-३-३२.

# पृथ्वी आणि स्वर्ग

[वृत्त–वसन्त]

मनीषा स्वर्गसौख्यांची जराही अन्तरीं नाहीं
रुचे माझी सदा मातें धरा वैचित्र्यपूर्णा ही !
फुलें, वेली, नद्या, सिन्धू धरेला चित्रिती रंगीं
इथें वर्णच्छटा नाना !—निळें सारेंच त्या स्वर्गीं !

चिरंजीवित्व तें स्वर्गीं लव स्थित्यन्तरावीण
जिणें हें श्रेष्ठ त्याहूनी क्षणाचें धावतें क्षीण !
जुनें भंगे, नवें रंगे; क्षणीं प्रत्येक नव कान्ती —
वरी भूमी; न स्वर्गींची इथें निर्जीव ती शान्ति !

तळें तें सांचलें तेथें, उधाणा सिन्धु हा येई
विचारांची कधीं शान्ती, विकारांचीं तुफानेंही !
मला या वादळीं ऐशा रुचे हाकारणें नाव
मिळावीं संकटें, घ्यावी तयांशीं झुंज, ही हांव !

जगीं या दुःख नान्दोनी सुखाला देतसे गोडी
खुले सौन्दर्य हास्याचें मिळोनी अश्रुंची जोडी
उन्हानें पोळतां काया तरू दे शीतला छाया
जिवाला गारठा येतां उबारा ऊन ये द्याया !

दुणावे प्रीति रोषानें, रुची संगा वियोगानें
जिण्याला मोल मृत्यूनें, तसें भोगास त्यागानें !
मला आयुष्य-मृत्यू वा सुखें-दुःखें फुलें दोन्ही
बनोनी भृंग मी गावें गमे दोघांहि चुम्बोनी !

असोत स्वर्गलोकींच्या परी लखलाभ देवांसी
शिलामूर्ती विलासांच्या सदा रंगेल उल्हासी !
कपोलीं सान्ध्यमेघांचें दिसावें मुग्ध जों हास्य
जिच्या नेत्रांत तों चाले पयोदांचें क्षणीं लास्य,

हृदींचीं स्पन्दनें जीच्या, विरोधी मानवी भावीं —
स्फुरावीं, मानवी मूर्ती अशी जीवास या व्हावी !
जगीं या पूर्तिपूर्वी प्रीतिच्या जी गोड हुर्हूर
मिळे का कल्पवृक्षाच्या तळीं ? आशाहि ती दूर !

विहारा नन्दनींच्या ना भुले हा जीव, त्याहून —
प्रवास प्रीतिपन्थींचा रुचे त्या कण्टकांतून !

मडगांव, जानेवारी १९३२.

# महात्म्यास—

[ जाति–माधवकरणी ]

१

द्वेष, अशान्ती, हिंसा जगतीं करिती थैमान

प्रीतिला सत्यास न मान

स्वार्थ शोधवी शत्रुविनाशा युक्ती नित्य नवी

मानवा दानव तो बनवी

राष्ट्रें कसलीं ?— क्रूर हिंस्र पशु दुबळ्यांच्यावरती

चढाई गुरगुरुनी करिती !

रुधिरसडे सांडले धरेवर ; दुर्बल हैराण !

जाहलें जग हें जणु रान.

२

तोंच मूर्ति तव तपःक्लान्त, कृश परि तेजःपुंज

भूषवी भारतभू-क्षितिज !

बाहु पसरिले पुढें प्रेममय हृदयीं कवळाया

दुष्टतामय जगताला या !

वितळिशील जें वसे द्वेषहिम विश्वान्तःकरणीं

वदनिंच्या मन्दस्मित-किरणीं !

स्वर्गीचे सन्देश जनांना वितराया आणी
सुधामय साधी तव वाणी !

३

—आणि विश्व हें स्वार्थसाधना क्षणभर विस्मरुनी
राहिलें बघत चकित नयनीं !

तव तत्त्वांची शान्तिदायिता हृदयीं अनुभवुनी
मोहुनी डोले तीं श्रवुनी

जडवादी अस्वस्थ मनाला पटे प्रचीती ही,
'गवसलें हरपे जें कांहीं !

उद्धरावया माय न केवळ, जगती सारीही
अवतरे थोर विभूती ही !'

४

तत्त्वज्ञांच्या आणि कवींच्या कल्पलोकिं वसती
आजवर जीं ध्येयें करिती

तूंच भगीरथ तयां आणिसी मर्त्य धरेवरती
कराया निर्मल पावन ती !

मार्ग काढिसी तूं सत्याच्या असिधारेवरुनी
संकटें आनन्दें वरुनी !

दरिद्रनारायणा सेविसी दुःखें परिहरुनी
कृत्रिम भेद दूर करुनी.

५

मुक्त कराया मायभूमि जी जाहली गुलाम
मांडिसी अभिनव संग्राम

इथें अनत्याचार झुंजतो भयकर शस्त्रांशीं
अहिंसा घोर प्रहारांशीं

बन्दूकांचा प्रतिकार इथें करि निधडी छाती
खवळल्या सत्तेचा शान्ति !

मानवांत नच, लढा असे हा जड-चैतन्यांत
बघे जग, कोण करी मात !

६

तनु पार्थिव तव कोंडुनि धरिली जरी बन्धनांत
पाशवी सत्तेनें मत्त

विचारमूर्ती तुझी वावरे जनमनविश्वांत
वाढत्या वैभवांत नित्य

स्वातन्त्र्यप्राप्त्यर्थ करावें लागे बलिदान,
बद्धता तव देई ज्ञान

मायमुक्तिला अतां बन्धु तव अविचल झटतील
निश्चयें ध्येय गांठतील !

७

अखिल जगाची एक काळची ही विचारजननी
पदीं त्या विराजेल फिरुनी !

विश्वमानवा दिव्य सृष्टिचें तुझ्या करें दार
उघडतां मग जगदुद्धार !

मडगांव, ता. १-९-३०.

# धर दीप वरी पाजळुनी !

[ जाति–प्रणयप्रभा ]

धर दीप वरी पाजळुनी
राहिं असा घन तमा उजळुनी !

किितक काजवे झगमग करिती
तिमिर परी लवभरी न हरिती
दीप्ति तयांची स्वतःचपुरती
मात्र मिरविती चळवळुनी !

तुरळक पणती मिणमिण जळुनी
अन्धुकतेनें मन गोन्धळुनी —
अधिकच टाकी गाढ तमाहुनि !
सोडी सगळें काजळुनी !

किरण-तुषारां पिस्कारुनियां
प्रक्षाळिसि तूं नयनां, हृदयां !
सत्य-मुखश्री झळकवुनीयां —
देसि, उरे जी झाकळुनी !

## नन्दादीप

ज्योति सुप्त तूं जागविसि किती
त्यांस आपुली लावुनि ज्योती
हाय ! परी तिज ठेवि तेवती —
प्राणच काय तुझा जळुनी ?

स्वयें दीपछायेंत मिसळुनी
सान्दिकोपरे देसि धवळुनी
तुजपुढती शिर खालीं वळुनी
जाय अहन्ता मावळुनी !

ता. १६-२-३३.

# रानफुलाचें हृद्गत

[ जाति–भूपती ]

जनदृष्टिआड जन्मून दूर रानांत
राहणें कौतुकावीण तिथें अज्ञात,

उमलुनी सकाळीं गळणें सायंकाळीं
जरि परमेशानें लिहिलें माझ्या भाळीं

मकरन्दबिन्दु ढाळीत, गन्ध विखरीत
हें क्षणिक अलक्षित जीवन करिन व्यतीत !

अनिलांत झुळकत्या स्वैर सुवास फिरेल
परि पल्लविं लपली तनु अज्ञात असेल !

मम हृदयगन्ध सुखवील अन्तरीं पान्थ
कधिं पावेल न परि भंग शान्त एकान्त !

पाहील चकित मग पथिक जों सभोंवार
हासेन मजेनें मनाशींच हळुवार !

* * *

जगताच्या बाजारांत नको मिरवाया
गोपनीं राहुनी झटेन त्या सेवाया

निजशिरीं विपत्ती झेलिन नीरव सर्व
अर्पीन जगाला मात्र जिवींचें सत्त्व !

जगिं गन्धमिषें मम हळुहळु प्राण विरेल
निर्माल्य तनू ही अन्तीं बनुनि उरेल

आत्मार्पण उजळो तदा खुलें मम हास्य
कांपवो न पवना मम निःश्वास उदास !

हा रिता विश्वपदिं करितां जीवनकुम्भ
धन्यता-गौरवें स्वयें भरेल तुडुम्ब !

मडगांव, ता. १७-२-३२.

# सख्या रे, ये आतां धावून !

[ जाति–गोविन्द ]

जीव जाय कावून   सख्या रे, ये आतां धावून !

क्रीडनास मज सिन्धुजलीं या उतराया लावून
क्षणांत अन्तर्धान कुठें तूं पावसि फुसलावून ?

लीला तव ही असेल म्हणुनी मनास समजावून —
कुठवर राहूं ? युगें लोटलीं हाय ! तुला जाऊन

या लाटेवर त्या लाटेवर नित्य हेलकावून
थकलों पुरता काळलहरिंच्या थडका या खाऊन !

नकळत आलों मी खेळाच्या भ्रमांत नादावून —
भर दरियामधिं ; बघसि अन्त किति मूर्ति न तव दावून ?

आरपार नच, अथांग जळ हें ! फिरति नयन पाहून
नसे साउली, डोईवरती रखरखतें बघ ऊन !

तूंच भाससी दूर निमिष, परि लाट उंच येऊन —
तुज लपवी, मज अडवि जावया तुजजवळी पोहून !

गरगर भवतीं फिरति भोंवरे सवेंच मज फिरवून
आ वासुनि मज क्षणांत गिळुनी टाकितील जिरवून

न हातपायच, धैर्यहि गळलें, तनु ये भारावून
पाण्यासंगें प्राणहि भिडले कण्ठाशीं येऊन !

अन्तिम घडि ही ! अन्त न पाहीं, ये कर सरसावून,
घे वरच्यावर झेलुनि मजला हाकेला पावून !

मडगांव, ता. २०-१-३०.

## मधुर तृप्ति

[वृत्त–बांसरी. राग–भैरवी]

जाहलें मला खुलें नवीन विश्व साजणी !
स्पर्शली तुझी जिवास प्रीति दिव्य ज्या क्षणीं

मौक्तिकाचिया रसीं
शिम्प रंगते जशी
उजळवी मला तुझी सतेज मूर्ति आंतुनी

मदिय लोचनांतुनी
चान्दणें ग शिम्पुनी
दिव्यता चराचरांत तूं दिलीस दावुनी.

कीं फुलांतुनी उले
गन्ध मन्द दर्वळे
तेविं गोड भावना उचम्बळे उरांतुनी.

दुःखही सुखासवें
रम्य रूप घे नवें
राहिली भरून एक माधुरीच जीवनीं.

जी अशान्त खळबळे
तृप्त ती नदी जळें
जीवनानुभूति ये गभीर सन्थ दाटुनी.

प्रीतिगानिं गुंगतां
जीव घे उदात्तता
विश्वसंगिताचिया लयींत लीन होउनी !

ता. ७-७-३४.

# लाजरी

[ जाति – प्रणयप्रभा ]

कां पळसि दुरी सखि ! बावरुनी
मधु भाव अनावर आवरुनी ?

मंगल मीलन झालें, फिटुनी —
अन्त:पट ग अपुल्यामधुनी ;
लाजभीतिमय परि तन्तूंनीं
पट मधिं कां विणिसी हा फिरुनी ?

ग्लानि पथीं मज ये तमजालीं
परी अरुण तव हसुनी गालीं
कळवी जीवन-पहाट झाली
तों क्षणीं मेघ येती वरुनी !

तनुहि गमे मज बन्ध मीलनीं
क्षणोक्षणीं परि जासि दुरावुनि
अथांग वाहे सरिता मधुनी
परतीरिं उभी तूं गांगरुनी !

पदीं मदीय न ठेवीं निज शिर
आन्दोळूं दे परि हृदयावर !
माळ नको मज, गुंफ गळां कर
ही पुरे तुझी पूजा दुरुनी

एकान्तीं तूं पूजिसि मजसी
झटसि मला परि चुकवायासी,
परि देव न मी, तूंहि न दासी
कधिं येशिल अन्तर हें तरुनी ?

ता. १७-८-३३.

# अकारण हुरहूर

[ राग – असावरी ]

अकारण कां मनिं ही हुरहूर ?
गगन झाकिलें सान्द्र घनांनीं, मलिन तया ये नूर
हिमशीतल हा थरकवि वारा चराचराचें ऊर
रिमझिम रिमझिम घुमतो जगतीं उदास एकच सूर.
धुन्द पोकळी ! वारा विखरी जलतुषार भुरभूर
लालनिळी नव आम्रपालवी कां अन्तरिं आतूर ?
सळसळ डुलत्या कणसा-पोटीं काय उठे काहूर ?
दिगन्त पुसुनी जाइ सरींनीं, नुमजे जवळी दूर
स्वप्नभूमि जग होई कसली उदास तरिहि मधूर ?
खोप उरे मम लोपुनि जणु जग येऊन प्रलय-पूर.
— आणि युगयुगें इथें कुणाच्या प्रतीक्षेंत मी चूर ?

ता. ४-७-३४.

# जीवन-वीणा

[ वृत्त - पाण्डव ]

स्पर्शुनी दैवें कलावन्ता ! तुझी रे अंगुली
जीवनाची मूक वीणा ही क्षणीं झंकारली

जागवीसी तूं तरंगां अन्तरंगीं शान्त या
सिन्धु तेथें कीं स्वरांचा तैं कळे, दे विस्मया !

देउनी आत्मप्रतीती दिव्य त्या एका क्षणीं
गुप्त होसी ! जाळि आतां जाणिवेची जाचणी.

घालिती हेलावुनी थैमान ऊर्मी अन्तरीं
जाहल्या ताराच सीमा नर्तना त्यांच्या परी.

बद्ध वीणेचीं ह्रदीं तूझ्याविना रे गुंजनें
अंगुलीच्या स्पर्शनें ये खोल त्यांचीं बन्धनें !

ता. १२-१०-३३.

# मेघाचें अश्रुगीत

[ चाल–प्रतिकूल होइल० यासारखी.
अन्तरा छन्दात्मक.]

येसि कधीं घेउनि ज्योत्स्ने ! किरणपुष्पमाला ?
तिमिर भाव-रंग पुसाया अन्तरीं रिघाला !

तरंगतां वाऱ्यावरी
चमकुनी परीपरी
सोनसळी जादू करी
क्रूर वंचनेंत परन्तू अन्ति लोटण्याला

घाली भुलभुलावणी
आणि वाग्बाणांतें हाणी
करी हृदयाचें पाणी
घाय अन्तरींचा अजुनी नसे तो बुजाला !

अश्रुजलें जागोजाग
फुलविले फुलबाग
परी वीज लावी आग
आणि मूर्त आशा मिळवी माझिया धुळीला.

## नन्दादीप

तीव्र झंझावातासवें
सैरावैरा गोते खावे,
विमनस्क भटकावें,
शून्य जीवनाचा क्रम हा एकमात्र झाला.

कळंजुनी गेल्या हृदीं
स्निग्ध आलोकन कधीं
वितरिशील, कौमुदी !
फुलें वेदनांतुनि उलत्या उमलवावयाला ?

ता. १५-१०-३३.

# संगीत-परिणति

[जाति–प्रणयप्रभा]

निःस्तब्ध रहा क्षणिं या, प्रणया !
मौनांत बोलुं दे निज हृदयां.

पुसट दूर गिरि क्षितिजीं दिसती
तरुतळिं छाया अचल पहुडती
खुले सृष्टिची अस्फुट नवती
चान्दण्यांत एकान्तामधिं या !

भिडव नयन तव मदीय नयनीं
हृदयज्योतिचें तुझ्या त्यांतुनी
स्निग्ध तेज मम नयनिं बिम्बुनी
ते स्तिमित डोलुं दे गुंगुनियां !

कर दे राहूं मम करयुगुलीं
झुळुकांनीं तनुवेल थरकली
पुलकफुलांनीं क्षणांत फुलली
ही केविं कुणीं केली किमया ? !

जन्मजन्म दुर्मिळ, ये घडि ती
हृदयें अपुलीं द्रुत धडधडती
काय वदाया गुज धडपडती ?
भाषा कळुनी न कळे उभयां !

मौन न हें, संगीत-परिणति
हृदय-कलशिं हो स्वरजल-भरती
उसव न आतां उद्गारांप्रति
स्वरकम्प नसनसीं अनुभवुंया !

मडगांव, नोव्हेंबर १९३२.

# विसावा

[जाति-भूपति]

चहुंकडे आजवरि भ्रमुनी श्रमलों वायां
तव पदीं विसावा आलों आतां घ्याया

तव हृत्कम्पाच्या तालावर गाईन
हें म्हणुनि लाविलें मम हृदयाचें बीन !

पिळवटुनी पिळिल्या परिस्थितीनें तारा
स्पर्शितांच आतां देतिल मधु झंकारा !

मज ठावें कीं हें माझें दुबळें बीन
नच जाइल याचा स्वर दिगन्त भेदून,

थाम्बेल एकदां कम्पन या तारांचें
स्वरमेळ घुमेल न तदन्तरीं जो सांचे !

रवि जाइल काळें कलुनि पश्चिमेपाशीं
येईल पसरुनी सांज जीवनाकाशीं !

मी दीपरागिणी आळवीन त्या समयीं
जी स्फूर्तिदीपकां चेतवील जनहृदयीं

स्वर विरतां विरतां मग ते अवकाशांत
ही सुखें ज्योत लय पावो विश्वात्म्यांत !

ता. २७-२-३०.

# जीवन—विराम

[राग–भैरवी]

जीवन मम सहज शान्त
होवो हें अनन्तांत !

माय-अंकिं पान-निरत
बाल जेविं सहज निजत
अंगाई-रविं गुंगत
कमल-नयन मिटत जात

निःश्वसनें तव उठली
ऊर्मि शान्त सिन्धुजलीं
फिरुनि विरो ती सलिलीं
विस्तारत जात गात

फुलुनि विश्वतरूवरी—
झुले फूल; हसत परी—
गळो तव अनन्त पदरिं
निकटि ये जरी दिनान्त

लिप्त स्वर्णमय धुक्यांत
धूसर जग दूर जात,
स्वप्नपुरी सुषुप्तींत
तेविं नुरो असीमांत !

ता. १७-८-३३.

# टिपा.

**गोमन्तदेवी.**— गोमन्तदेवी = गोमन्तकभूमि. दूधसागर = दूधसागरचा धबधबा. प्रसाधन-साधन = वेषभूषेचें साहित्य.

**पावसाळ्यांतील दृश्य.**—दुखी = वेदना.

**विनवणी.**—गीम = ग्रीष्म.

**सृष्टीच्या अंगणांत.**—माड = नारळी. वेळ = समुद्रकिनारा.

**तळमळ.**—बावतां = कोमेजतां. साळीक = कमळ.

**शापित अहल्या.**—दमळ = आभाळांत ढग जमून पडलेलें सावट. मळभ = आभाळांत जमलेले ढग.

**चन्द्रकिरण.**—कवळुनि = गुंडाळून.

**भाताचें रोप.**—मेर = शेतांतील खाचराचा बारीक बांध. जोत = औत. कसणी = नांगरणी.

**गोमन्तक-गीत.**—कुळागर = पोफळींचें बन.

**सिंहावलोकन.**—सांगाती = सोबती.

**संगीत-परिणति.**—'प्रणया ! ' हें संबोधन इंग्रजींतील 'My love ! ' या प्रयोगाप्रमाणें वापरलें आहे. ही कविता माझे कविमित्र श्री. बा. भ. बोरकर यांच्या खालील कवितेस उत्तर म्हणून लिहिली आहे:—

## प्रणयमुग्धेस

नादांत गुंगसी जें शब्दांत सांग बाले !
आषाढच्या घनें कां त्वन्नेत्र भारलेले ?
होसी रसार्द्र केवीं झुकतेस द्राक्षवेली
ओठांत वेदनेची मदिराहि सांठलेली
पायांस अन्तराचा कां भार साहवेना ?
कां बोल घोळलेला ओठांतुनी सुटेना ?
कां सावलींत तूझ्या बघतेस बावरून ?
भलतीच लाज मेली वद गे सखे त्यजून.
घे शेत हेलकावे तव कां विळी न चाले ?
नादांत गुंगसी जें शब्दांत सांग बाले !

---

# प्रथम चरणांची सूचि.

पृष्ठांक



---